जबरदस्ती करू नये.

..... मी जशी गायीची पूजा करतो तशीच मनुष्याचीही पूजा करतो मग तो हिन्दु असो किंवा मुसलमान असो. मग काय गायीला वाचवण्यासाठी मी मुसलमानाशी भांडू? त्याला मी मारीन? असे केल्याने मी मुसलमान आणि गायीचा शत्रू होईन. यासाठी मी म्हणेन की माझ्या कल्पनेनुसार गायीचे रक्षण करण्याचा एकच उपाय आहे, तो म्हणजे मला आपल्या मुसलमान बंधूंसमोर हात जोडायला हवे आणि त्याला देशासाठी गायीला वाचवले पाहिजे हे समजवायला हवे. जर तो समजत नसेल तर गायीला मरू द्यावे पण मुसलमानाचे प्राण घेतले जाऊ नयेत. हाच धार्मिक कायदा आहे, हे तर मी मानतोच आहे.

.... दोन्ही जमातीत अविश्वास आहे. म्हणून मुसलमान लॉर्ड मोर्लेकडून काही हक्क मागतात. याला हिन्दूंनी का विरोध करावा? जर हिन्दूंनी विरोध केला नाही तर इंग्रज चकित होतील, मुसलमान हळू हळू हिन्दूंचा भरवसा करतील आणि दोघात बंधुभाव वाढेल."

यात म. गांधीनी हिन्दु-मुसलमानात विश्वास निर्माण व्हावा यावरच भर दिला आहे.

: ११ :

'हिन्दुस्थानची दशा' या अध्यायाच्या चौथ्या भागात वकीलांवर म. गांधींनी मतप्रदर्शन केले आहे. त्यात ते म्हणतात "वकीलांनी हिन्दुस्थानला गुलाम बनवले आहे, त्यांनी हिन्दु-मुसलमानात भांडणे वाढवली आहेत आणि इंग्रजी सत्तेला मजबूत केले आहे.

..... वकीलांच्या सज्जनतेचे जे अनेक किस्से पहायला मिळतात ते जेव्हा ते स्वतःला वकील मानण्याचे विसरले, तेव्हाच घडले आहेत. मला तर आपणास हेच दाखवायचे आहे की, त्यांचा धंदा त्यांना अनीती शिकवतो. ते वाईट लालचित फसतात. त्यातून बाहेर पडणारे विरळेच असतात. ....वकील लोक बेकार आहेत. आळशी लोक ऐश आराम करण्यासाठी वकील होतात, ही खरी गोष्ट आहे. वकीलीचा पेशा मोठा प्रतिष्ठित पेशा आहे, असे शोधून काढणारेही वकीलच आहेत. कायदे ते करतात त्याची प्रशंसाही तेच करतात. लोकांकडून काय किंमत घ्यावी हे सुद्धा तेच ठरवतात आणि लोकांवर धाक निर्माण करण्यासाठी देखावा असा करतात जसे ते आकाशातून उतरून आलेले देवदूत असावेत!

..... काय आपण हे मानता की इंग्रजी न्यायालये इथे नसती तर ते आमच्या देशात राज्य करू शकले असते? न्यायालये लोकांच्या भल्यासाठी नाहीत. ज्यांना आपली सत्ता कायम राखावयाची आहे ते न्यायालयाच्या द्वारा लोकांना स्वतःच्या कह्यात ठेवतात. लोक जर स्वतः झगडले तर त्यात तिसरा आपली सत्ता निर्माण करणार नाही. खरोखरीच जेव्हा लोक स्वतः मारपीट करून अथवा नातेवाईकांना पंच करून भांडले असते तर ते बहादुर असते. न्यायालयात आले आणि ते भित्रे झाले. लोक आपसात भांडून मरावे याला जंगली म्हटले जात होते. आता तिसरा माणूस भांडण मिटवतो हे काय कमी जंगलीपणाचे आहे? काय कोणी असे म्हणू शकेल की तिसरा माणूस जो निर्णय देतो तो खरा निर्णय असतो? कोण खरा आहे हे दोन्ही बाजूचे लोक जाणतात. आम्ही भोळेपणात मानून घेतो की तिसरा माणूस आमच्याकडून पैसे घेऊन आमचा न्याय करतो. ..... जर वकील वकीली करणे सोडून देतील आणि तो पेशा वेश्येच्या पेशासारखा नीच मानतील तर इंग्रजी राज्य एका दिवसात तुटून जाईल. वकीलांनी हिन्दुस्थानी प्रजेवर आरोप लावले आहेत की आम्हाला भांडणे प्रिय आहेत, आणि आम्ही कोर्ट कचेरीरूपी पाण्यातले मासे आहोत.

जे शब्द मी वकीलांसाठी उपयोगात आणतो तेच शब्द न्यायाधीशांनाही लागू पडतात. हे दोन्ही मावसभाऊ आहेत आणि परस्परांना बळ देणारे आहेत."

वकील-न्यायाधीशांच्या बाबतीतले म. गांधींचे मतप्रदर्शन विस्फोटक आहे. पण ते सत्याधारित आहे. कारण, माणसांच्या भांडणांना वकील व न्यायाधीशांमुळे संधी उपलब्ध होत असते. ही संधी, एक धंदा म्हणूनच ते निर्माणही करतात ही वस्तुस्थिती आहे!

: १२ :

'हिन्दुस्थानची दशा' या अध्यायातला पाचवा भाग डॉक्टर या विषयाचा आहे. पश्चिमेच्या सुधारकांनी म. गांधीपेक्षा जास्त कठोर शब्दात वकील आणि डॉक्टरांची



अनुक्रमणिका

निंदानालस्ती केली आहे, हे सांगून त्यातल्या एका लेखकाने एका विषारी वृक्षाचे चित्र कसे रेखाटले आहे याचे वर्णन करताना गांधीजी म्हणतात "लेखकाने एक विषारी चित्र रेखाटले आहे. वकील, डॉक्टर आदि निकृष्ट धंदा करणाऱ्यांना वृक्षांच्या फांद्यांच्या रूपात दाखवले आहे आणि त्या वृक्षाच्या देहावर नीति-धर्माची कुऱ्हाड उचलली आहे. अनीतीला त्या सर्व धंद्यांचे मूळ व खोड मानले आहे.

दवाखाना पापाचे मूळ आहे. यामुळे लोकशरीराचे जतन कमी करतात आणि अनीतीला वाढवतात.

युरोपचे डॉक्टर तर सीमा गाठतात. ते फक्त शरीराचे चुकीचे जतन करण्यासाठी लक्षावधी जीवांना दरवर्षी मारतात, जिवंत जीवांवर प्रयोग करतात. असे करणे कोणत्याच धर्माला मान्य नाही. हिन्दु, मुसलमान, ख्रिस्ती, जरथोस्ती सर्वच धर्म म्हणतात की माणसाच्या शरीरासाठी एवढ्या जीवांना मारण्याची गरज नाही. ..... डॉक्टर आम्हाला धर्मभ्रष्ट करतात हे स्पष्ट आणि सरळ आहे. याचा परिणाम असा होतो की, आम्ही निःसत्त्व आणि नामर्द बनतो आहोत. अशा दशेत आम्ही लोकसेवा करण्याच्या लायक राहत नाही आणि आम्ही शरीराने क्षीण व बुद्धिहीन होत जात आहोत. इंग्रजी वा युरोपीयन डॉक्टरी शिकणे गुलामीची गाठ घट्ट करण्यासारखे आहे.

डॉक्टर कशासाठी ही सुद्धा विचार करण्याची गोष्ट आहे. याचे खरे कारण तर प्रतिष्ठा आणि पैसा मिळवण्याचा धंदा करण्याची इच्छा हे आहे. त्यात परोपकार करण्याची गोष्ट नाही आहे. त्या धंद्यात परोपकार नाही हे मी सांगून चुकलो आहे."

डॉक्टरी पेशावर म. गांधींनी कठोर प्रहार केलेले आहेत. कारण, हा पेशाच नीतिधर्माला अनुसरून नाहा, असे त्यांना वाटत होते. पण, आधुनिकतेत याचा स्वीकार केला जात नाही. कारण, आधुनिकता नीतिधर्माचे परिपालन करणारी नाही, असाच त्यांचा अभिप्राय झालेला होता!

: १३ :

खरी सुधारणा कोणती? हा प्रश्न उपस्थित करणारा तेरावा अध्याय आहे. यात म. गांधी म्हणतात "जे बीज आमच्या पूर्वजांनी पेरले आहे त्याची बरोबरी करू शकेल असे काहीही पाहण्यात आलेले नाही. रोम मातीत मिसळला. ग्रीसचे फक्त नावच राहिलेले आहे, इजिप्तची बादशाही गेली. जपान पश्चिमेच्या मिठीत फसला, आणि चीनविषयी काहीच सांगता येत नाही. पण, पडलेला-तुटलेला कसाही असो हिन्दुस्थान आजही पायात भक्कम आहे.

सुधारणा एक आचरण आहे ज्यात माणूस आपले कर्तव्य पार पाडतो. कर्तव्य पार पाडण्याचा अर्थ आहे नीतीचे पालन करणे. नीतीचे पालन करण्याचा अर्थ आहे मन आणि इंद्रियांना नियंत्रणात ठेवणे. असे करून आम्ही स्वतःला (आपला अस्सलपणा) ओळख असतो. हीच सुधारणा आहे. याच्या उलट आहे ते 'बिघाड' आहे.

असे नव्हते की आम्हाला यंत्रादींचा शोध करताच येत नव्हता. पण, आमच्या पूर्वजांनी पाहिले की लोक जर यंत्र आदिच्या झंझटीत पडतील तर गुलाम होतीलआणि आपल्या नीतीला सोडून देतील. त्यांनी समजून उमजून म्हटले की, आम्ही आपल्या हातापायांनी जे काम होऊ शकेल तेच करायला हवे. हातपायांचा उपयोग करण्यातच खरे सुख आहे, त्यातच शारीरिक सुदृढता आहे.

त्यांनी विचार केला की, मोठी शहरे वसवणे ही नसती झंझट आहे. त्यात लोक सुखी राहणार नाहीत. त्यात धूर्तांच्या टोळ्या आणि वेश्यांच्या बोळी निर्माण होतील; गरीब श्रीमंतांकडून लुटले जातील. म्हणूनच त्यांनी लहान खेड्यात संतोष मानला.

त्यांनी पाहिले की राजे आणि त्यांच्या तलवारीपेक्षा नीतीचे बळ जास्त बलवान आहे. म्हणून, त्यांनी राजांना नीतीमान पुरुष, ऋषि आणि फकीरांपेक्षा खालच्या दर्जाचे मानले. असे ज्या प्रजेचे संघटन आहे, ती प्रजा दुसऱ्यांना शिकवण्या लायक आहे, ती दुसऱ्याकडून शिकण्या लायकीची नाही.

या प्रजेत न्यायालये होती, वकील होते, डॉक्टर-वैद्य होते. पण ते सर्व योग्य प्रकारे नियमानुसार चालत होते. सर्व जाणत होते की, हे धंदे मोठे धंदे नाहीत. आणि वकील, डॉक्टर आदि लोकात लूट चालवत नव्हते. ते तर लोकांचे आश्रित होते. ते लोकांचे मालक होऊन राहत नव्हते. न्याय पुष्कळ चांगला होता. न्यायालयात न जाणे हे लोकांचे ध्येय होते. त्यांना भ्रमात टाकणारे स्वार्थी लोक नव्हते. ही प्रजा तर स्वतंत्र राहून आपल्या शेतीचा मालकी हक्क भोगत होती. त्यांच्या जवळ खरे स्वराज्य होते.

आपण पाहिले की, खरी सुधारणा मी कशाला म्हणतो. वर जे चित्र मी रेखाटले आहे असा हिन्दुस्थान जिथे असेल त्यात जो माणूस बदल करेल त्याला शत्रू मानावे. तो माणूस पापी आहे.

हिन्दच्या सुधारणेचा कल नीतीला मजबूत करण्याकडे आहे, पश्चिमेचा सुधारणेचा कल अनीतीला मजबूत करण्याकडे आहे, त्याला मी 'बिघाड' म्हटले आहे. पश्चिमेची सुधारणा निरीश्वरवादी आहे. हिन्दची सुधारणा ईश्वर मानणारी आहे.

हे समजून, श्रद्धा ठेऊन हिन्दच्या हितचिंतकांना हिन्दच्या सुधारणेशी मूल जसे आईला चिकटून राहते तसे चिकटून राहायला हवे."

खऱ्या सुधारणेचा अर्थ समजावून सांगताना म. गांधींनी नैतिक आचरणावर भर दिलेला आहे. यातूनच भारताची सुधारणा होईल व ती ईश्वरनिष्ठ आहे, असे नि:संदिग्धपणे प्रतिपादिलेले आहे.

: १४ :

'हिन्द कसा स्वतंत्र होईल' या चौदाव्या अध्यायात म. गांधी म्हणतात "ज्यांनी पश्चिमेचे शिक्षण घेतले आहे आणि जे त्याच्या पाशात अडकून पडले आहेत, तेच गुलामीत घेरले गेले आहेत. आम्ही जगाला आमच्या दमडीच्या मापाने मोजतो आहोत. जर आम्ही गुलाम आहोत तर जगालाही आम्ही गुलाम मानले आहे.

आम्ही आपल्यावर राज्य करणेच स्वराज्य आहे, आणि ते स्वराज्य आपल्या हातात आहे.

बुडणारा माणूस दुसऱ्याला तारणार नाही. परंतु पोहणारा माणूस दुसऱ्याला तारेल. आम्ही स्वत: गुलाम झालो आणि दुसऱ्याला स्वतंत्र करण्याची गोष्ट करू तर ते शक्य होणार नाही.

हिन्दुस्थानचे बळ असाधारण आहे. म्हणून दुसऱ्यांशी आमचा संबंध कमी आहे. मी आपणास सांगितले की, जेव्हा अन्य संस्कृती मातीत मिसळून गेल्या तेव्हा हिन्दी सुधारणेला धक्का लागला नाही.

इंग्रजांना या ठिकाणी आणणारे आम्ही आहोत आणि ते आमच्यामुळे इथे राहतात. हे तुम्ही कसे विसरता की आम्ही त्यांच्या सुधारणा स्वीकारलेल्या आहेत, म्हणून ते याठिकाणी राहू शकतात? तुम्ही त्यांचा द्वेष करता आहात तो द्वेष त्यांच्या सुधारणांचा करायला हवा."

यांत म. गांधींनी इंग्रजांच्या सुधारणा भारतीयांनी स्वीकारल्या म्हणूनच इंग्रज या ठिकणी राहू शकले आहेत, असे सांगून त्यांचा द्वेष करण्याऐवजी त्यांच्या सुधारणांचा द्वेष करायला हवा, हे स्पष्ट करून सांगितले आहे.

: १५ :

'इटाली आणि हिन्द' या पंधराव्या अध्यायात म. गांधी म्हणतात "मैझिनीचा इटाली अजून गुलाम आहे. काही देशी रियासत्तांमध्ये प्रजा पीडित आहेत. तिथले शासक नीचतेने लोकांना चुरडून टाकतात. त्यांचा अत्याचार इंग्रजांच्या अत्याचाराहून जास्त आहे. असा अत्याचार जर आपण हिन्दुस्थानात इच्छित असाल तर ते पटणार नाही.

सगळ्या हिन्दींना सशस्त्र करणे तर हिन्दुस्थानला युरोपसारखे करणे होईल. जर असे झाले तर आज युरोपची वाईट स्थिती आहे तशी हिन्दची होईल. थोडक्यात म्हणजे हिन्दला युरोपची सुधारणा स्वीकारावी लागेल. असेच जर होणार असेल,तर चांगले हे होईल की, इंग्रज त्या सुधारणेत कुशल आहेत म्हणून त्यांनाच या ठिकाणी राहू द्यावे. त्यांचेशी थोडेफार भांडून काही प्राप्त करू काही प्राप्त करणार नाही आणि आपले दिवस काढत राहू. पण, गोष्ट अशी आहे की, हिन्दची प्रजा कधीच शस्त्र उचलणार नाही; उचलू नये हेच

अनुक्रमणिका

ठीक आहे.

आम्ही नपुंसक झालो आहोत म्हणून खून करण्याचा विचार करतो आहोत असे करून तुम्ही कोणाला स्वतंत्र करणार? हिन्दचे लोक हे कधीच इच्छित नाहीत. आमच्यासारखे ज्यांनी अधम सुधारणेची भांग प्यायलेली आहे ते नशेत असा विचार करतात. खून करून जे लोक राज्य करतील ते प्रजेला सुखी करू शकणार नाहीत. धिंगराने जो खून केला, जे खून हिन्दुस्थानात झालेले आहेत, त्याने देशाला फायदा झाला आहे असे जर कोणी मानत असतील तर ती मोठी चूक आहे. धिंगरांना मी देशाभिमानी मानतो, पण त्याचे देशप्रेम वेडेपणा होता. त्याने आपल्या शरीराचे बलिदान चुकीच्या पद्धतीने दिले. त्याने तर शेवटी देशाला नुकसानच होणार आहे.

...... भयाने मिळालेली वस्तू जोपर्यंत भय कायम राहील तोपर्यंतच टिकून राहू शकते."

यात इटाली आणि भारताच्या परिस्थितीची तुलना म. गांधींनी केली असून मैझिनीचा इटाली त्याच्या प्रयत्नानंतर गुलामच राहू शकला आहे, असा अभिप्राय त्यांनी दिला.

: १६ :

'गोला बारूद' या सोळाव्या अध्यायात म. गांधी म्हणतात "…. इंग्रजांनी मारकाट केली आणि आम्हीसुद्धा करू शकतो, हे ठीक आहे. पण, मारकाट करून त्यांना जशी वस्तू मिळाली तशीच आम्हीही घेऊ शकतो. तुम्ही कबूल कराल की, तशी वस्तू तर आम्हाला नकोच आहे. तुम्ही मानता की, साधन आणि साध्य– साधन आणि अभिलाषा यांच्यामध्ये काही संबंध नाही, ही फार मोठी चूक आहे. या चुकीमुळे जे धार्मिक म्हणवतात त्यांनी भयंकर कृत्ये केली आहेत. हे तर धतुऱ्याचे विषारी रोप लावून मोगऱ्याच्या फुलांची इच्छा करण्यासारखे होईल. माझ्यासाठी तर समुद्रापलीकडे जाण्याचे साधन जहाजच होऊ शकते. जर मी पाण्यात बैलगाडी टाकून देईन तर ती गाडी व मी दोघेही समुद्राच्या तळाशी जाऊन पोहोचू. जसा देव तशी पूजा – हे वाक्य विचार करण्यालायक आहे. त्याचा चुकीचा अर्थ लावून लोक भुलाव्यात पडले आहेत. साधन बीज आहे, आणि प्राप्त करणारी वस्तू झाड आहे. म्हणून संबंध बीज आणि झाड या दोहोमध्ये आहे तेवढाच संबंध साधन आणि साध्य यामध्ये आहे. सैतानाला भजून मी ईश्वर भजनाचे फळ प्राप्त करीन, हे कधीच होणार नाही.

इंग्रजांनी मारकाट करून १८३३ मध्ये मताचा विशेष अधिकार मिळवला. काय मारकाट करून ते आपले कर्तव्य समजू शकले? त्यांची इच्छा अधिकार मिळवण्याची होती म्हणून मारकाट माजवून त्यांनी ते मिळवले. खरे अधिकार तर कर्तव्याचे फळ आहे, ते त्यांनी मिळवले नाहीत. परिणाम असा झाला की सगळ्यांनी अधिकार मिळवण्याचा प्रयत्न केला. पण, कर्तव्य झोपून गेले. …. नेहमीच नव्हे तर अधिकाधिक प्रसंगात शस्त्रबळापेक्षा दयाबळ जास्त शक्तिमान सिद्ध होत असते. शस्त्रात हानी आहे, दयेत ती कधीच नाही. ….. आता अर्जाची गोष्ट घेऊ. ज्याच्यामागे बळ नाही त्याचा अर्ज व्यर्थ आहे यात शंका नाही. तरीही न्यायमूर्ती रानडे म्हणतात, की अर्ज लोकांना शिक्षण देण्याचे साधन आहे. त्यात लोकांना आपल्या स्थितीचे भान करवले जाऊ शकते आणि राज्यकर्त्यांना चेतवले जाऊ शकते. असा विचार केला तर अर्ज व्यर्थ वस्तू नाही. बरोबरीच्या माणसाने अर्ज केल्यास ती त्याच्या नम्रतेची खूण मानली जाईल. गुलाम अर्ज करेल तर ती त्याच्या गुलामीची खूण असेल. ज्या अर्जामागे बळ आहे तो बरोबरीच्या माणसाचा अर्ज आहे आणि तो आपली मागणी अर्जाच्या रूपात जाहीर करतो आहे हे त्याचे खानदानीपण दर्शवणारे आहे.

अर्जाच्या मागे दोन तऱ्हेचे बळ असते. एक तर 'जर देणार नसाल तर आम्ही तुम्हाला मारू' हे गोला बारूदचे बळ आहे. 'जर आपण देणार नसाल आम्ही तुमचे अर्जदार असणार नाही. आम्ही अर्जदार असू तर तुम्ही बादशाह होऊन राहाल. आम्ही तुमच्याशी कोणताच व्यवहार करणार नाही' या बळाला वाटले तर दयाबळ म्हणावे वाटले तर आत्मबळ वा सत्याग्रह म्हणावे हे बळ अविनाशी आहे आणि या बळाचा उपयोग करणारा आपल्या स्थितीला बरोबर समजतो.

याचा समावेश आमच्या बुजुर्गांनी 'एक नव्हे सर्व रोगांचे औषध' यामध्ये केलेला आहे. हे बळ ज्याच्यात आहे त्याचे काहीही वाईट शस्त्रबळ करू शकत नाही."

या सोळाव्या अध्यायात शस्त्रबळ, अर्जबळ आणि आत्मबळाची एक निश्चित ओळख करून घेऊनच आत्मबळाची दृष्टी म. गांधींनी स्वीकारलेली आहे. यातूनच सत्याग्रहाचा दृष्टिकोण त्यांना उपलब्ध होऊ शकलेला होता.

: १७ :

'सत्याग्रह – आत्मबळ' हा सतरावा अध्याय. 'हिन्द स्वराज्य' पुस्तकातला कळसाध्यायच म्हणावा लागेल. यात ते म्हणतात

"दया धरम का मूल है, पापमूल अभिमान,
तुलसी दया न छांडिये, जब तक घट में प्राण।

मला तर हे वाक्य शास्त्र वचनासारखे वाटते. जसे दोन आणि दोन चारच होतात. तेवढाच भरवसा वरच्या वचनावर माझा आहे. दयाबळ आत्मबळ आहे, सत्याग्रह आहे. आणि या बळाची प्रमाणे पदोपदी नजरेला येतात. जर हे बळ नसते तर पृथ्वी रसातळाला (सातपाताळा पैकी एक) पोहोचली असती.

...... इतिहास ज्या इंग्रजी शब्दाचा अनुवाद आहे आणि ज्या शब्दाचा अर्थ बादशहाची तवारीख आहे, त्याचा अर्थ घेतल्याने सत्याग्रहाचे प्रमाण मिळू शकत नाही. जस्ताच्या खाणीत तुम्ही जर चांदी शोधू लागला तर ती कशी मिळणार? 'हिस्टरी' मध्ये जगभरच्या कोलाहलाची कथा मिळेल. म्हणून, गोऱ्या लोकात म्हण आहे की, ज्या प्रजेची 'हिस्टरी' नाही आहे ती प्रजा सुखी आहे. राजे कसे खेळत होते, कसे खून करत होते, कसे वैर बाळगत होते, हे सर्व 'हिस्टरी' मध्ये मिळते. जर हाच इतिहास असता, जर एवढेच झाले असते, तर दुनिया केव्हाच बुडाली असती. दुनियेची कथा युद्धाने सुरू झाली असती तर आज एकसुद्धा माणूस जिवंत नसता. जी प्रजा युद्धाची शिकार झाली तिची अशीच दशा झाली आहे. ऑस्ट्रेलियाच्या हबशी लोकांची नावनिशाणी मिटली आहे. त्यांच्यापैकी कदाचितच कोणाला ऑस्ट्रेलियाच्या गोऱ्यांनी जगू दिले असेल. ज्यांचे मूळच नाहीसे झाले ते सत्याग्रही नव्हते. जे जिवंत राहतील ते पाहतील की ऑस्ट्रेलियाच्या गोऱ्यांचो देखील तीच गत होईल. 'जे तलवार चालवतात त्यांचा मृत्यु तलवारीनेच होतो' (पट्टीच्या पोहणाऱ्या) 'तैराकाचा मृत्यु पाण्यात' अशी आमच्यात म्हण आहे.

दुनियेत जेवढे लोक अजूनही जिवंत आहेत त्यावरून हेच सांगितले जाते की दुनियेचा आधार शस्त्रबळावर नाही आहे, परंतु सत्य, दया वा आत्मबळावर आहे. म्हणून इतिहासाचे सर्वात मोठे प्रमाण हेच आहे की दुनिया युद्धातल्या उपद्रवानंतरही टिकून आहे. यास्तव युद्धाच्या बळाऐवजी दुसरे बळच त्याचा आधार आहे.

.... 'हिस्टरी' अस्वाभाविक गोष्टीच नोंदत असते. सत्याग्रह स्वाभाविक आहे. म्हणून तो नोंदवणे जरूरीचे नाही आहे!

..... सत्याग्रह वा आत्मबळाला इंग्रजीत 'पॅसिव रेजिस्टन्स' म्हटले जाते.

कायदा आम्हाला (पसंत) मान्य नसला तरी त्यानुसार चालायला हवे ही शिकवण मर्दपणाच्या विरुद्ध आहे, धर्माच्या विरुद्ध आहे आणि गुलामीची सीमा आहे.

..... दुसऱ्यांनी घडवलेले कायदे खऱ्या माणसांना बंधनकारक नसतात. बिचारे सरकारसुद्धा म्हणत नाही की 'तुला असेच करावे लागले' ते म्हणते की 'तुम्ही जर असे करणार नसाल तर तुम्हाला शिक्षा होईल.' आम्ही आमच्या अधम दशेच्या कारणास्तव मानून चालतो आहोत की आमला असेच करायला हवे, हे आमचे कर्तव्य आहे, हा आमचा धर्म आहे.

जर एकदा लोक शिकले की जो कायदा आम्हाला अन्यायी वाटतो त्याला मानणे नामर्दगी आहे, तर कोणताही अत्याचार आम्हाला बांधू शकत नाही. हीच स्वराज्याची किल्ली आहे.

..... सगळ्या सुधारणा व शोध बहुतेक लोकांच्या विरोधात जाऊन काही लोकांनी लावलेले आहेत. ठगांच्या गावात जर बहुतांनी म्हटले की ठगविद्या शिकायलाच हवी, तर काय कोणी साधू ठग बनेल? मुळीच नाही. अन्यायी कायद्यांना मानायला हवे हा मिथ्या संदेह (वहम)

जोपर्यंत दूर होत नाही तोपर्यंत आमची गुलामी जाणार नाही. आणि या मिथ्या संदेहाला (वहम) फक्त सत्याग्रहच दूर करू शकतो.

..... घाण्याच्या बैलासारखे डोळ्यांवर पट्टी बांधून भलेही आम्ही मानले की पुढे जात आहोत पण वस्तुतः बैलासारखेच आम्ही गोल चक्करच काढत असतो. जे लोक असे मानतात की जे काय स्वतःला मान्य (पसंत) नाही त्याला मान्य करण्यासाठी माणूस बांधलेला नाही आहे त्यांनी तर सत्याग्रहच खरे साधन मानायला हवे, अन्यथा मोठा बिकट परिणाम निघेल.

.... काय तुम्ही मानता की भित्रा आणि अशक्त माणूस मान्य नसलेला कायदा मोडू शकेल? ॲक्स्ट्रिमिस्ट तोफबळ – पशुबळवाले आहेत. ते कां कायदा मान्य करण्याची गोष्ट करीत आहेत? मी त्यांचा दोष काढत नाही. ते अन्य काही करूच शकत नाहीत. ते स्वतः जेव्हा इंग्रजांना मारून राज्य करतील तेव्हा तुम्हा आम्हांस बळजबरीने कायदा मान्य करायला लावतील. त्यांच्या पद्धतीला हेच म्हणणे योग्य आहे. पण, सत्याग्रही तर म्हणेल की, जो कायदा त्याला मान्य नाही त्याला मान्यता देणार नाही. जरी त्याला तोफेच्या तोंडी बांधले गेले तरीही!

तुम्ही काय मानता? तोफ चालवून शेकडोंना मारण्यास धैर्याची गरज आहे वा हसता हसता तोफेच्या तोंडावर बांधले जाण्यात धैर्याची गरज आहे. स्वतः मृत्यूला तळहातावर ठेऊन जो चालतो-फिरतो तो रणवीर आहे की दुसऱ्याचा मृत्यु आपल्या हाती ठेवतो तो रणवीर आहे?

हे नक्की माना की, नामर्द माणूस क्षणभरही सत्याग्रह करू शकत नाही.

तुम्ही हिन्दुस्थान म्हणजे मूठभर राजे लोक असा अर्थ करता आहात. माझ्या मनात तर तो हिंदुस्थान म्हणजे कोटी कोटी शेतकरी आहेत ज्यांच्या आसऱ्याने राजे आणि आम्ही जगतो आहोत. .... जगातला बहुतेक भाग आदेश मानणारा आहे. त्यांना तोफबळ वा सत्याग्रहाचे बळ शिकवायला हवे. जिथे ते तोफबळ शिकतात तिथे राजा-प्रजा दोघेही वेड्यासारखे होतात. जिथे आदेश मानणाऱ्यांनी सत्याग्रह करणे शिकले आहे त्या ठिकाणी राजाचा अत्याचार त्याच्या तीन गजाच्या तलवारीच्या पुढे जात नाही. आणि आदेश मानणाऱ्यांनी अन्यायी आदेशाची पर्वाही केलेली नाही. शेतकरी कोणाच्याही तलवारीच्या बळावर वश न कधी झाले व होणारही नाहीत. ते तलवार चालवणे जाणत नाहीत, न कोणाच्या तलवारीला घाबरत असतात. मृत्युला नेहमी आपली उशी करून झोपणारी ती महान प्रजा आहे. त्यांनी मृत्यूची भीती सोडलेली आहे, म्हणून सर्वांची भीती सोडलेली आहे. इथे मी अवास्तव चित्र चितारतो आहे असे वाटेल तर ते ठीक आहे. पण, जे तलवारीच्या बळाने चकित झालेले आहोत त्यांच्यासाठी हे काही जास्त नाही आहे.

मला आठवते की एका रियासतमध्ये रैयतांना अमूक आदेश पसंत आले नाहीत, यामुळे रैयतने देशत्याग (हिजरत) करणे सुरू केले. राजा घाबरला. त्याने रैयतची क्षमा मागितली आणि आदेश मागे घेतले. अशी उदाहरणे तर फार मिळू शकतात. पण, ती भारतभूमीतूनच निपजलेली असतील. अशी रैयत (प्रजा) ज्या ठिकाणी आहे त्याच ठिकाणी स्वराज्य आहे. त्याच्या विना स्वराज्य कुराज्य आहे. .... जे देशाच्या भल्यासाठी सत्याग्रही होऊ इच्छितात त्यांना ब्रह्मचर्याचे पालन करायला हवे, गरीबी स्वीकारायला हवी, सत्याचे पालन तर करायलाच हवे आणि त्यात अभय यायला हवे.

..... अभयाच्या अभावी तर सत्याग्रहाची गाडी एक पाऊल देखील पुढे जाऊ शकत नाही. अभय सर्वतऱ्हेने व सर्व बाबतीत असावयाला हवे. वस्तूंची, खोट्या प्रतिष्ठेची, सोयऱ्या संबंधियांची, राजदरबाराची, जखमेची आणि मरण्याची भीती नसेल तरच सत्याग्रहाचे पालन होऊ शकते."

या सतराव्या अध्यायात सत्याग्रह व आत्मबलाविषयी जे स्पष्टीकरण म. गांधींनी केले आहे, तोच हिन्द-स्वराज्याचा आत्मा आहे. म्हणून याला कळसाध्यायच म्हणायला हवे! सत्याग्रहासाठी अभयाचे महत्त्व देण्याचा या अध्यायात केलेला प्रयत्न अतिशय मौलिक व सार्वकालीन महत्त्वाचा मानायलाही हवा!

: १८ :

शिक्षण हा अठराव्या अध्यायातला विषय आहे. यात म. गांधी म्हणतात "…. एका शस्त्राने चिरफाड करून आजाऱ्याला चांगले करता येऊ शकेल. आणि तेच शस्त्र कोणाचे प्राण घेण्यासाठी कामात आणले जाऊ शकेल. अक्षर ज्ञानाचेही असेच आहे. बहुतेक लोक त्याचा वाईट उपयोग करतात, हे तर आम्ही पाहतोच आहोत. त्याचा चांगला उपयोग तुलनेने कमीच लोक करतात. ही गोष्ट बरोबर असेल तर यातून हे सिद्ध होते, की अक्षर ज्ञानाने फायद्याच्या ऐवजी नुकसानच जास्त झाले आहे.

….. पश्चिमेच्या प्रभावाखाली येऊन आम्ही ही गोष्ट चालवली आहे की लोकांना शिक्षण द्यायला हवे. पण, त्याविषयी आम्ही पुढच्या-मागच्या गोष्टींवर विचार करीत नाही.

…. इंग्रज विद्वान हक्सली याने शिक्षणाबाबतीत म्हटले आहे, "त्या माणसाने खरे शिक्षण घेतले आहे ज्याच्या शरीराला अशी सवय लावली गेली आहे की ते त्याच्या नियंत्रणात राहते, आरामात आणि सहजपणे सोपवलेले काम करते. त्या माणसाने खरे शिक्षण मिळवले आहे. ज्याची बुद्धी शुद्ध, शांत आणि न्यायदर्शी आहे. त्यांने खरे शिक्षण घेतले आहे. ज्याचे मन नैसर्गिक नियमांनी भरलेले आहे आणि ज्याची इंद्रिये त्याच्या नियंत्रणात आहेत, ज्याच्या मनाची भावना अत्यंत शुद्ध आहे, ज्याला निकृष्ट दर्जाच्या कामांची घृणा आहे आणि जो स्वत:सारखेच दुसऱ्याला मानतो असा मनुष्यच खरा शिक्षित मानला जाईल. कारण तो निसर्गाच्या नियमानुसार चालतो. निसर्ग त्याचा चांगला उपयोग करील आणि तो निसर्गाचा चांगला उपयोग करेल." जर हेच खरे शिक्षण आहे तर मी शपथ घेऊन सांगीन की, वर जे शास्त्र मी गणलेले आहे त्यांचा उपयोग माझ्या शरीर वा माझ्या इंद्रियांना नियंत्रित करण्यासाठी मला झाला नाही. म्हणून, प्राथमिक शिक्षणाला घ्या अथवा उच्च शिक्षणाला घ्या पण त्याचा उपयोग मुख्य गोष्टीत नाही होत. त्यामुळे आम्ही माणूस बनत नाही, आम्ही आमचे कर्तव्य जाणू शकत नाही.

…… कोटयवधि लोकांना इंग्रजी शिक्षण देणे हे त्यांना गुलामीत टाकण्यासारखे आहे. मेकॉलेने शिक्षणाचा जो पाया भरला तो गुलामीचा पाया होता. त्याने याच इराद्याने आपली योजना बनवली होती, असे मी सुचवू इच्छित नाही. पण त्याच्या कामाचा परिणाम हाच निघाला आहे. हे कसले कंगाल दैन्य आहे की आम्ही स्वराज्याची गोष्टसुद्धा परकीय भाषेत करतो आहोत?

….. जर हे दीर्घकाळ चालत राहिले तर माझे म्हणणे आहे की येणारी पिढी आमचा तिरस्कार करील आणि त्याचा शाप आमच्या आत्म्याला लागेल.

….. तुम्हाला हे समजायला हवे की, इंग्रजी शिक्षण घेऊन आम्ही प्रजेला गुलाम केले आहे. इंग्रजी शिक्षणामुळे दंभ, राग, अत्याचार आदि वाढले आहेत. इंग्रजी शिक्षण घेतले त्यांनी लोकांना ठगविण्यात त्यांना त्रास देण्यात काहीही शिल्लक ठेवले नाही. जर आम्ही इंग्रजी शिक्षण घेतलेले त्यांच्यासाठी काहीही करीत असू, तर त्यांचे आमच्यावर जे ऋण चढलेले आहे त्याचा काही भागच परत देत आहोत.

….. हिन्दुस्थानला गुलाम बनवणारे तर आम्ही इंग्रजी जाणणारे लोक आहोत. प्रजेची व्यथा इंग्रजांमुळे नाही तर आमच्यामुळे वाढली आहे.

…… आम्ही सभ्यतेच्या रोगात असे फसलो आहोत की, इंग्रजी शिक्षण घेतल्याविना काम चालवू शकू अशी वेळ राहिलेली नाही. ज्यांनी हे शिक्षण घेतले आहे त्यांनी त्याचा चांगला उपयोग करावा. इंग्रजांबरोबरच्या व्यवहारात, आणि इंग्रज स्व:त आपल्या संस्कृतीमुळे कसे कष्टात पडले आहेत हे समजण्यासाठी इंग्रजी चालवली जावी. जे इंग्रजी शिकले आहेत त्यांच्या मुलांना प्रथम नीती शिकवायला हवी. त्यांची मातृभाषा शिकवायला हवी आणि शिवाय हिन्दुस्थानातली आणखी एक भाषा शिकवायला हवी. मूल जेव्हा पूर्ण पक्क्या वयातले होईल तेव्हा त्याने भलेही इंग्रजी शिक्षण घ्यावे, आणि तेही त्या शिक्षणाचा शेवट करण्याच्या उद्देशाने, त्याच्या द्वारा पैसे मिळवण्याच्या उद्देशाने नव्हे असे करत असतानाही आम्हाला विचार करायला हवा, की इंग्रजीत काय शिकायला हवे, आणि काय शिकायला








नको आहे. कोणते शास्त्र शिकायला हवे यावर देखील विचार करावा लागेल. थोडा विचार केल्याने लक्षात येईल, की जर इंग्रजी पदवी घेणे बन्द करून टाकले तर इंग्रजी शासक चकित होतील.

..... हिन्दुस्थानच्या सागर किनाऱ्यावरच घाण साचलेली आहे. त्या घाणीने जे उकिरडे झाले आहेत त्यांना स्वच्छ करावे लागेल. आम्ही असेच आहोत. आणि स्वत: पुष्कळ काही स्वच्छ होऊ शकतो आहोत. माझी ही टीका कोट्यवधि लोकांच्या बाबतीत नाही. हिन्दुस्थानला खऱ्या वाटेवर आणण्यासाठी आम्हालाच खऱ्या वाटेवर यावे लागेल. उरलेले कोट्यवधि तर खऱ्या वाटेवरच आहेत. त्यांच्यात सुधारणा आणणे, बिघडविणे, उचलणे कालानुरूप होतच राहील. पश्चिमेच्या सुधारणेला घालवून देण्याचाच आम्हाला प्रयत्न करायला हवा. आणि बाकीचे सगळे आपोआप होत राहील."

अठराव्या अध्यायात म. गांधींनी शिक्षणाबाबतीत जे मतप्रदर्शन केले आहे व खऱ्या शिक्षणाची पाठराखण केलेली आहे त्याला स्वराज्याचा मूलभूत पाया रचण्याच्या दृष्टीने अति महत्त्वाचे मानलेले आहे. ते निव्वळ लक्षात घेण्यासारखेच नाही तर भविष्य घडवण्याच्या बाबतीत भान ठेऊन अनुसरण्याचे आहे.

**: १९ :**

एकोणिसावा अध्याय यंत्रांच्या बाबतीतला आहे. यात म. गांधी म्हणतात की, ".... हिन्दुस्थानातून जी हस्तकला (कारागिरी) जवळजवळ नष्ट झालेली आहे ते मँन्चेस्टरचेच काम आहे.

..... यंत्रे युरोपला उजाड करू लागली आहेत. आणि तिथली हवा आता हिन्दुस्थानात चालू लागलेली आहे. यंत्र आजच्या सुधारणेचे (सभ्यता) मुख्य चिन्ह आहे आणि ते महापाप आहे, हे मी स्वच्छ पाहू शकतो आहे.

..... अमेरिकेच्या रॉकफेलराहून हिन्दुस्थानचे रॉकफेलर काही कमी नाहीत, असे मानणे नुसते अज्ञान आहे. गरीब हिन्दुस्थान तर गुलामीतून सुटू शकेल. पण अनीतीने पैसेवाला झालेला हिन्दुस्थान गुलामीतून कधीच सुटू शकणार नाही.

मला तर वाटते की आम्हाला हे मान्य करावे लागेल की, इंग्रजी राज्याला इथे टिकवून धरणारे हे धनवान लोकच आहेत. अशा स्थितीतच त्यांचा स्वार्थ साधेल. पैसा माणसाला लाचार बनवतो, अशी दुसरी वस्तू जगात विषयभोग आहे, हे दोन्ही विषय विषासमान आहेत. त्यांचा दंश सर्पाच्या दंशाहून भयंकर आहे. जेव्हा साप चावतो तेव्हा तो आमचे शरीर घेऊन आम्हाला सोडून देतो. पण जेव्हा पैसा आणि विषय (वासना) चावतात तेव्हा देह, ज्ञान, मन सर्व काही घेतात तरीही आमची सुटका होत नाही. म्हणून आमच्या देशात (मील) कापड गिरण्या हा उद्योग स्थापित व्हावा यात खूष होण्यासारखे काहीच नाही.

..... मातीच्या दिव्यात तेल ओतून आमच्या शेतात निर्माण झालेल्या रूई (कापूस)ची वात करून दिवा जाळू. असे केल्याने डोळे (खराब होण्यापासून) वाचतील, पैसे वाचतील, आणि आम्ही स्वदेशी राहू, असू आणि स्वराज्याची धुनी जागवू.

.... मला आठवते की, शहरात पैशांची जेव्हा चणचण झाली होती तेव्हा ट्राम, वकीलांची, डॉक्टरांची मिळकत घसरली होती. पण लोक तन्दुरूस्त (स्वस्थ) झाले होते."

यंत्राचा एकदेखील गुण माझ्या लक्षात येत नाही. पण त्याच्या अवगुणांचे तर मी पूर्ण पुस्तक लिहू शकतो. .... 'विषाला विष औषध आहे' हे एक उदाहरण आहे. यात यंत्राचा कोणताच गुण नाही. यंत्र मरता मरता म्हणते की, 'माझ्यापासून लोकहो सावध रहा, माझ्यापासून तुम्हाला कोणताच फायदा होणार नाही' जे यंत्रांच्या मिठीत आवळले गेले आहेत त्यांनाच असे वाटते की यंत्रांमुळे किती तरी सोयी झाल्या आहेत व सुखे वाढली आहेत. .... यंत्र ही वाईट गोष्ट आहे याची खूणगाठ बांधली पाहिजे. तरच आम्ही त्याचा हळू हळू नाश करू.

..... यंत्रावर आमच्या गोड नजरेच्या ऐवजी विषारी नजर पडली तर ते शेवटी जाईल."

एकोणिसाव्या अध्यायात म. गांधींनी यंत्र हे आजच्या सुधारणेच्या म्हणजे सभ्यतेच्या मुख्य लक्षणातले आहे,

आणि ते महापाप आहे, असे म्हटले आहे. हे सध्याच्या काळात मान्य करण्यासारखे नाही व मान्य केले जाणारही नाही. पण, यंत्राचे स्वरूप हस्त कौशल्यातल्या चरख्या सारखे अल्पप्रमाणतेचे (स्मॉलस्केल) असले तर ते उपयोगी असेल, असे म. गांधींनी मानलेच होते. म्हणून त्यांनी दक्षिण आफ्रिकेतून भारतात परतल्या नंतर १९१५ साली साबरमती काठावर आश्रमाची स्थापना केली व चरख्याचा शोध घेतला होता. अशा तऱ्हेने खादी-ग्रामोद्योगांचे महत्त्व लक्षात घेऊन रचनात्मक कार्याचा पुरस्कार केला. त्यांच्या लक्षात आले असावे म्हणूनच यासाठी आवश्यक ती यंत्रे स्वीकारली. म. गांधी सर्वस्वी यंत्रविरोधीच होते असे जे मानले गेले होते त्यात बदल घडून आला. म. गांधी यंत्रविरोधीच होते अशी धारणा काहीनी करून घेतली होती ती शेवटी चुकीचीच ठरली. मनुष्यशक्तीला पूरक पोषक यंत्र असावे ते मारक नसावे, असा विवेक यंत्राच्या बाबतीत त्यांनी केला म्हणूनच सिंगरसारखे शिवणयंत्र त्यांनी स्वीकारलेही होते. पण, मानवी श्रमशक्तीचे शोषण करणारे कोणतेही यंत्र त्यांनी मान्य केले नव्हते. जगातली सध्याची शोषणकारी स्थिती लक्षात घेता ते योग्यही होते, असेच शेवटी म्हणावेही लागते!

: २० :

'छुटकारा' म्हणजे बंधनातून मुक्त होणे. हा शेवटचा विसावा अध्याय आहे. यात म. गांधी म्हणतात "एक्स्ट्रिमिस्टांना मी म्हणेन की तुमचा हेतू हिन्दुस्थान-साठी स्वराज्य प्राप्त करण्याचा आहे. स्वराज्य तर प्रत्येकाने स्वतःसाठी प्राप्त करायला हवे आणि स्वीकारायला हवे. दुसऱ्या लोकांनी स्वराज्य देववावे ते स्वराज्य नव्हे, उलट परराज्य आहे. म्हणून, इंग्रजांना बाहेर काढले की तुम्ही स्वराज्य प्राप्त कराल असे जर मानत असाल तर ते ठीक नाही.

मॉडरेटांना (मवाळ) मी म्हणेन की आम्ही नुसती लाचारी पत्करू तर ती आमची हीनता आहे.

.... इंग्रजांना मी सांगेन की, राजे असतानाही तुम्हाला आमचे नोकर होऊन राहावे लागेल. तुमचे म्हणणे आम्ही ऐकायचे असे नव्हे तर आम्ही म्हटलेले ते तुम्हास करावे लागेल.

....तुम्ही निर्माण केलेल्या शाळा आणि न्यायालये आमच्या कामाच्या नाहीत. यांच्याऐवजी आमच्या जुन्या शाळा आणि न्यायालये आम्हाला हव्या आहेत.

हिन्दुस्थानची भाषा इंग्रजी नाही हिन्दी आहे. ती तुम्हाला शिकावी लागेल. आणि आम्ही तर तुमच्याशी आपल्या भाषेतच व्यवहार करू.

तुम्ही रेल्वे आणि सैन्यासाठी अतोनात खर्च करता हे आमच्याच्याने पाहवत नाही. याची आम्हाला गरज वाटत नाही. रशियाची भीती तुम्हाला असेल आम्हाला नाही. ते येतील तेव्हा त्यांचेशी निपटून घेऊ. तुम्ही असाल तर आपण दोघे मिळून त्यांच्याशी निपटून घेऊ. आम्हाला विलायती वा युरोपीय कापड नको आहे. या देशात निर्माण होणाऱ्या वस्तूंनीच आम्ही आमचे काम चालवू.

.... जर आमच्यात काही दम असेल तर तुम्ही पहाल की, तुमचा मद (घमेंड) बेकार आहे. आणि तुमचे हसणे विनाश काळाच्या विपरीत बुद्धीचे चिन्ह आहे. .... हिन्दी प्रजेने तर तुमच्याशी थोडाच संबंध ठेवलेला आहे. तुम्ही तुमची सुधारणा जी वस्तुतः बिघडवणे आहे, सोडून आपल्या धर्माला पडताळून पाहू शकला तर तुम्हाला वाटेल की, आमची मागणी योग्य आहे. याच तऱ्हेने तुम्ही हिन्दुस्थानात राहू शकता. जर या पद्धतीने तुम्ही इथे राहू शकला तर तुमच्यापासून जे थोडे शिकायचे आहे ते आम्ही शिकू आणि आमच्याकडून तर जे तुम्हाला पुष्कळ शिकायचे आहे ते तुम्ही शिकाल. या तऱ्हेने (एक दुसऱ्याकडून) लाभ घेऊ शकू आणि जगाला लाभ देऊ शकू. पण, हे तर तेव्हाच होऊ शकते जेव्हा आमच्या संबंधाचे मूळ धर्मक्षेत्रात रूजेल.

... ज्या हिन्दींना (स्वराज्याची) खरी सुस्ती मस्ती चढलेली असेल तेच इंग्रजांना वरच्या गोष्टी सांगू शकतील व त्यांच्या धाकाखाली दबणार नाहीत.

खरी मस्ती त्यांनाच चढते जे ज्ञानपूर्वक समजून उमजून हे मान्य करतात की हिन्दी संस्कृती सगळ्यात चांगली आहे आणि युरोपाची संस्कृती तर तीन दिवसाचा









तमाशा आहे. अशा संस्कृती तर आजवर कितीतरी झाल्या आणि मातीत मिसळल्या, यापुढे कितीतरी होतील व मातीत मिसळून जातील.

खरी सुस्ती त्यालाच होऊ शकते जो आत्मबळ अनुभवीत शरीर बळामुळे दबून जाणार नाही आणि निर्भय होऊन राहील, आणि स्वप्नात सुद्धा तोफबळाचा उपयोग करण्याच्या गोष्टीचा विचार करणार नाही.

खरी सुस्ती त्याच हिन्दीला असेल ज्याला आजच्या लाचार स्थितीपासून उबग आलेली असेल आणि ज्याने आधीपासूनच विषाचा प्याला प्यायलेला असेल.

असा हिन्दी एक जरी असेल तर तो वरची गोष्ट इंग्रजांना सांगेल आणि इंग्रजांना त्याची गोष्ट ऐकावी लागेल.

वर सांगितलेल्या गोष्टी ह्या मागण्या नाहीत. भारतीयांची मनाची दशा त्या दर्शवीत आहेत. मागून काहीच मिळत नाही. ते तर स्वतःला घ्यावे लागेल. त्याला घेण्याची शक्ती असावयाला हवी."

अशा शक्तीची एकोणीस संख्येची यादी म. गांधींनी दिली आहे. या आधी विवेचन केलेल्या गोष्टींचा या ना त्या कारणास्तव या यादीत समावेश झालेला असल्यामुळे त्याचा विस्तार या ठिकाणी करण्याचे टाळलेले आहे.

शेवटी संपादक या नात्याने वाचकाचा निरोप घेताना पुन्हा संक्षेपात ज्या बाबी म. गांधीनी नमूद केल्या आहेत त्या अशा आहेत.

१) आपल्या मनाचे राज्य स्वराज्य आहे.

२) त्याची किल्ली सत्याग्रह, आत्मबळ वा करुणाबळ आहे.

३) या बळाला आजमावण्यासाठी स्वदेशीला पूर्णपणे स्वीकारणे गरजेचे आहे.

४) जे आम्हाला करावयाचे आहे ते आमच्या मनात इंग्रजांविषयी द्वेष आहे म्हणून करू नये किंवा शिक्षा देण्यासाठी करू नये. यासाठी करावे की असे करणे आपले कर्तव्य आहे. अर्थ असा की इंग्रजांनी मिठावरचा कर रद्द केला. घेतलेले धन परत केले, सगळ्या हिन्दीना मोठे मोठे हुद्दे दिले आणि इंग्रजी सेना मागे घेतली तर आम्ही त्यांच्या कापड गिरण्याचे कापड वापरू वा इंग्रजी भाषा कायम करू वा त्यांच्या कला कौशल्याचा वापर करू अशी गोष्ट नाही. हे समजायला हवे की, हे सर्व न करण्यासारखे आहे म्हणून ते आम्ही करणार नाही. मी जे काही म्हटले आहे ते इंग्रजाविषयी द्वेष आहे म्हणून नव्हे, उलट त्यांच्या संस्कृतीविषयी तिटकारा असल्यामुळे म्हटले आहे.

मला वाटते की आम्ही स्वराज्याचे नाव तर घेतले पण आपल्याला त्याचे स्वरूप समजलेले नाही आहे. मी ते जसे समजलो आहे तसेच या ठिकाणी सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

माझे मन मला साक्ष देत आहे की, असे स्वराज्य मिळवण्यासाठी माझा देह समर्पित आहे.

‘हिन्द स्वराज्य’ या हिन्दी अनुवादासाठी म. गांधींनी जी प्रस्तावना लिहिली त्यात कापड गिरण्यांविषयी जे आधी म्हटले होते त्यात परिवर्तन करून म्हटले आहे की, "कापड गिरण्यांच्या विषयीच्या माझ्या विचारात इतकेच परिवर्तन झाले आहे की, हिन्दुस्थानच्या आजच्या स्थितीत मैन्चस्टरच्या कापडाऐवजी हिन्दुस्थानातल्या कापड गिरण्यांना प्रोत्साहन देऊनसुद्धा आमच्या गरजेचे कापड आपल्या देशात निर्माण करावयाला हवे." (१९२१)

इंग्रजी अनुवादाच्या प्रस्तावनेसंदर्भात म. गांधी म्हणतात "जर यात काही मला सुधारणा करावयाची असेल तर मी एक शब्द (वेश्या) सुधारू इच्छितो. एका इंग्रज स्त्री मित्राला मी तो शब्द बदलण्याचे वचन दिले आहे. मी पार्लमेन्टला ‘वेश्या’ म्हटले आहे. हे विचार त्या स्त्रीला पसंत नाहीत. तिच्या कोमल हृदयाला या शब्दाच्या ग्राम्य भावामुळे दुःख पोहोचलेले आहे." (१९२१)

**उपसंहार –**

महात्मा गांधींनी ‘हिन्द स्वराज्य’ लिहिले त्या काळात (१९०९) ब्रिटिश साम्राज्याचा विस्तार झालेला होता. हा विस्तार ब्रिटिश सुधारणेच्या आकर्षणातलाही होता. राजकारण, शिक्षण, अर्थकारण व समाजकारण या सर्वांवरच ब्रिटिश सुधारणेचा प्रभाव पडलेला होता. म्हणून, स्वराज्य प्राप्तिस्तव केल्या जाणाऱ्या चळवळी-

समोर येणाऱ्या अडचणीही बिकट स्वरूपाच्याच झालेल्या होत्या. कारण, एकूणच मनुष्य जीवनाला ब्रिटिश सुधारणांच्या अनुषंगानेच वळण दिले जात होते. यातच इंग्रजी शिक्षण म्हणजे वाघिणीचे दूध आहे, असे म्हटले ही जात होते! याचा प्रभाव भारतावर झाला होता व तो दिवसेंदिवस वाढतच गेला होता. आता तर भारतातल्या मातृभाषा, प्रादेशिक व क्षेत्रीय भाषांवर इंग्रजीचा प्रभाव पडून या भाषा नष्ट होतील किंवा काय असे वाटू लागलेले आहे. इंग्रजी भाषेने ब्रिटिश साम्राज्यवादाचा प्रभाव भारतावर इतका पाडला, की इंग्रजी भाषेमुळे भारताला पारतंत्र्यात लोटले गेले असावे, असे म्हटले जाऊ शकते. तेव्हा, अशा बिकट परिस्थितीत म. गांधींचे अनुसरण सध्या करता येऊ शकेल, किंवा कदाचित ते अनुसरण करताच येणार नाही, असे म्हटले जाऊ शकते. पण, यामुळेच स्वराज्याचा अर्थ सध्याच्या भारतीय परिस्थितीत इतका संकोच पावलेला आहे की, स्वराज्य नसले तरी चालू शकेल, असे त्यातून ध्वनित होत असते! ही परिस्थिती भारताच्या भवितव्याला काळोखात लोटणारी म्हणता येईल. कारण, स्वराज्याची आस्था नसलेला भारतीय समाज पारतंत्र्यालाच स्वातंत्र्य म्हणत असावा, असे वाटून जाते. जयप्रकाश नारायण यांनी पटन्याला महाविद्यालयात शिक्षण घेताना त्यावेळचे ज्येष्ठ काँग्रेस पुढारी अबूल कलाम आजाद यांचे व्याख्यान ऐकले होते. त्याची आठवण एकदा त्यांनी सांगितली होती. अबुल कलाम आजाद म्हणले होते की, इंग्रजी भाषा म्हणजे 'गोडविष' आहे. हे विष जस जसे चाखले जाते तसतसे अधिकच गोड वाटू लागते. भाषेच्या माध्यमातून ब्रिटिशांनी भारतावर अशी भुरळ पाडलेली आहे, की यातून भारत स्वतंत्र झाला असूनही अद्याप स्वतःला सावरू शकलेला नाही. म्हणून, म. गांधींनी 'हिन्द स्वराज्य' मध्ये जे प्रतिपादन केलेले आहे, ते अधिकच महत्त्वाचे वाटू लागते. कारण, स्वराज्याची जी लक्षणे त्यांनी 'हिन्द स्वराज्या'त सांगितलेली आहेत त्यातले एक लक्षण देखील ओझरते का होईना सध्या पहायला मिळत नाही. म्हणून, स्वराज्य प्राप्त करण्याची प्रक्रिया ही एक निरंतर प्रक्रियाच आहे, ती थांबता कामा नये याचे भान व्हावे लागते व भान ठेवता यावे या दृष्टीने स्वराज्याला अनुसरूनच परिवर्तनाच्या चळवळी होतच राहाव्या लागतील. या दृष्टीने सध्या भारतात काळोख पसरलेला असावा, अशीच एक परिस्थिती दिसते आहे.

जागतिक पातळीचा विचार केल्यास स्वातंत्र्य वा स्वराज्याला जसे पाहिले जाते आहे, ते नुसत्या भोगवादाच्या पुरस्कारातलेच असावे, असे वाटू शकते. कारण, स्वराज्यात वा स्वातंत्र्यात जगणे म्हणजे निव्वळ भोगवासनेत तुडुंब बुडून जाणेच आहे, असे मानले जात असावे, असे काहीसे जागतिक पातळीवरचे चित्र दिसते आहे. पण, भोगवाद वा उपभोगवाद हा विकासाचा अविभाज्य अंग करून घेतलेला असल्यामुळे विकासाला आत्मिक विकासाचा चुकूनदेखील स्पर्श होत नसावा किंवा झालेलाच नसावा, असे वाटते. म्हणून, उपभोगवाद, भोगवाद विकासाच्या अनियंत्रित आकर्षणातून नुसता चंगळवादच झालेला असावा, असे साधार म्हणता येऊ शकते.

या सर्वच बाबतीत विचार केल्यास विकास ही संकल्पना ज्या एका प्रमाणात विकृत झालेली दिसते आहे ते निश्चयपूर्वकच बदलावे लागणार आहे. याचे संकेत म. गांधींच्या 'हिन्द स्वराज्य' मधून मिळतात व हे जागतिक पातळीवर अतिशय अनुरूप आहे याची खात्रीही वाटते!

तात्पर्य असे की, 'हिन्द स्वराज्य' या पुस्तकातले शंभर वर्षापूर्वी केलेले प्रतिपादन सध्या जागतिक भवितव्याच्या दृष्टीने विचार प्रवृत्त करायला लावणारे आहे, असेच यावेळी वाटते आहे. कारण, स्वराज्य वा स्वातंत्र्याचा विचार हा मनुष्य संस्कृती टिकवून तिला समृद्ध करीत जाण्याचाही विचार आहे. हे 'हिन्द स्वराज्य' पुस्तकाचे मननपूर्वक वाचन केल्याने कोणाच्याही लक्षात येऊ शकेल. म्हणून ती अद्याप कालबाह्य रचना म्हणता येत नाही व म्हणूही नये. हेच या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल!



अनुक्रमणिका

# मोहनदास क. गांधींचे चरित्र 'अशक्य'

लेखक : क्लोद मार्कोव्हिटझ्
अनुवाद : प्रा. डॉ. व्ही. व्ही. बडवे



निरनिराळी सांस्कृतिक पार्श्वभूमी व वेगवेगळी ध्येयधोरणे असणाऱ्या लेखकांनी गांधींची चरित्रे लिहिली आहेत. इतक्या प्रमाणात इतर कोण्या व्यक्तीची चरित्रे बहुधा लिहिली गेली नसतील. भारतीय चरित्रलेखकांना त्यांच्याविषयी वाटणारे आकर्षण स्वाभाविक आहे असे म्हणता येईल; पण अभारतीय लेखकांनी दर्शविलेले आकर्षण हे अधिक कुतूहलजनक आहे. व्यावसायिक चरित्रलेखकांना गांधींचे चरित्र लिहिणे हे विशेष करून आव्हानात्मक वाटते असे दिसते. याचे कारण एकीकडे विपुल प्रमाणात उपलब्ध असलेला त्यांच्यासंबंधीचा दस्तावेज व त्यावरील उपलब्ध असलेली अनेक जणांनी केलेली भाष्ये आणि दुसरीकडे त्यांच्या व्यक्तिमत्वातील सतत जाणवणारा गूढतेचा अंश, या दोहोंमध्ये व्यक्त होणारा विरोधाभास हे होय. गांधींच्या जीवनाबद्दल आपल्याकडे विपुल माहिती आहे : त्यांची भाषणे व प्रत्यक्ष कृती यासंबंधीचा तपशिलवार वृत्तांत कुठे छापून आलेला नसेल असे क्वचितच घडले; त्यात महात्माजींनी स्वतः घातलेली भर याचाही समावेश होतो. आणि तरीही त्यांच्या खोलवरच्या प्रेरणा कुठल्या होत्या, यासंबंधी उद्भवणारे प्रश्न व अनुमाने यांची समाधानकारक उत्तरे देण्यास त्यांचे चरित्रलेखक अपयशी ठरलेले आहेत. गांधींच्या उपलब्ध असलेल्या चरित्रांची संख्या हजारावर असण्याची शक्यता आहे. (त्यात इंग्लिश भाषेतच लिहिलेल्या चरित्रांची संख्या पाचशे नोंदली गेलेली आहे) पण तरीही गांधी अजूनही एक गूढ आहे असे वाटते. त्यांच्या संदर्भात चरित्र लेखन या वाङ्मय प्रकाराचे हे अपयशच आहे असे सुद्धा म्हणता येईल. यांतील काही चरित्रे तरी एका मर्यादित अर्थाने महत्वाची नाहीत असा त्याचा अर्थ नाही; पण यापैकी एकही चरित्र अंतिमतः निर्णायक व प्रमाणभूत म्हणता येईल असे उपलब्ध नाही.

### गांधींचे चरित्रलेखक

गांधींच्या हयातीतच त्यांच्या मित्रांनी किंवा डोक वा पोल्याक (Doke, Polak) या त्यांच्या शिष्यांनी व रोमाँ रोलाँ (Romain Rolland) सारख्या चाहत्यांनी, शिवाय लुईफिशरसारख्या पत्रकारांनी गांधींची काही चरित्रे लिहिली होती. त्यांच्या मृत्युपश्चात त्यांच्या चरित्रांची संख्या अनेक पटीनी वाढलेली आहे. चार शीर्षकांखाली त्यांची विभागणी करता येईल : संतचरित्रे; सप्रमाण दस्तावेज उद्धृत करणारी चरित्रे; साहित्यिक मूल्ये असणारी चरित्रे; आणि चोखंदळ मूल्यमापन करणारी चरित्रे. यातील पहिला प्रकार भारतात भरभराटीस आला; त्यामध्ये इंग्रजी व अनेक प्रांतिक भाषांत शेकड्यांनी लिहिलेल्या चरित्रांचा समावेश होतो. संतचरित्रे बव्हंशी हौतात्म्यवादी या प्रकारात मोडतात : भारतीय स्वातंत्र्य लढ्यासाठी आणि धार्मिक कडवेपणाविरुद्धच्या लढ्यामध्ये गांधी हुतात्मा झाले अशी मांडणी ही पुस्तके करतात. अशी पुस्तके गांधींनी धार्मिक विभाजनापलीकडे जाऊन भारतीय ऐक्यासाठी आपले बलिदान दिले या गोष्टीवर भर देतात व त्यांच्या ठिकाणी असलेली असाधारण मानवी मूल्ये अधोरेखित करतात. या प्रकारचे चरित्रलेखन भारताबाहेरील लेखकांनीही केलेले आहे. उदा. फ्रान्समधल्या कामिय् ड्रेव्हर (C. Drever, Gandhi, Savie, son oeuvre, avec un expose'de sa philosophic. Paris, 1967) यांनी लिहिलेली पुस्तके आणि त्यांनी केलेली कार्ये; त्या शांततेसाठी झटणाऱ्या कार्यकर्त्या होत्या व त्यांनी 'ग्रुप देझामिस द गांधी' (Groups desamis de Gandhi) या संस्थेच्या माध्यमातून गांधींच्या शिकवणुकीचा प्रसार केला. गांधी हे एक ख्रिश्चन संत होते या विचाराकडे त्यांचा कल होता; तसा तो इंग्लंड व अमेरिकेतही अनेक जणांचा होता.

लिखित स्वरूपातील दस्त ऐवजांचा उपयोग जणू आपले आरक्षित क्षेत्र आहे या समजुतीने भारतीय

अनुक्रमणिका

लेखकांनी लेखन केले; त्याचा परिपाक १९५०-१९६० या काला-वधीत तेंडुलकरांनी आठ खंडात लिहिलेले प्रचंड चरित्र होय. (D. G. Tendulkar, *Mahatma : Life of Mohandas Karamchand Gandhi*, New Delhi; 1960-3, 8 vols.); व बी. आर. नंदानी एका खंडात लिहिलेले चरित्र (B. R. Nanda, *Mahatma Gandhi, A Biography*, Delhi, 1989 (1sted. London, 1958). अशा तऱ्हेच्या चरित्रलेखनात दस्तावेजांच्या उपयोगाचा उत्कृष्ट मिलाप झालेला आढळतो आणि या पुस्तकांच्या अनेक आवृत्त्याही प्रसिद्ध झालेल्या आहेत. या दोन ग्रंथांनंतर गांधींच्या जीवनातील काही विशिष्ट बाजूवर मर्यादित लिहिण्या-साठीच जागा उरते. त्यानंतर नऊ खंडात उपलब्ध असलेले 'गांधींचे संपूर्ण लेखन' (*The Collected Works of Mahatma Gandhi* New Delhi 1958-84, 90 vols). हा ग्रंथ संशोधकांसाठी एक खाणच आहे; त्यामध्ये काही विशिष्ट त्रुटी व समीक्षेची अपूर्ण साधने जाणवत असली तरीसुद्धा.

गेल्या तीन दशकात साहित्यिक स्वरूपाची व/ किंवा चोखंदळपणे मूल्यमापन करणारी गांधी चरित्रे खूपच लिहिली गेली आहेत. या चरित्रांचे लेखक बहुत करून व्यावसायिक इतिहासकार नसल्यामुळे त्यांच्याकडे ऐतिहासिक संदर्भाच्या ज्ञानाचा अभाव जाणवतो. ब्रिटिश, अमेरिकन व भारतीय लेखकांनी इंग्रजीत लिहिलेल्या या चरित्रांची गुणवत्ता समसमान नसल्यामुळे अशा तऱ्हेने लिहिल्या गेलेल्या चरित्रांच्या विशाल संग्रहातून काही थोडीच पुस्तके त्यातील गुणवत्तेमुळे अथवा त्यातील अभिजात नवीन दृष्टिकोणामुळे उठून दिसतात. एरिक एरिक्सन (Erik Erikson) यांचा महात्म्याचे मानस-शास्त्रीय चरित्र लिहिण्याचा प्रयत्न चित्तवेधक आहे. एरिक्सन गांधींच्या लहानपणी त्यांनी अनुभवलेल्या भावनिक आघातावर आधारित त्यांच्या पुढील आयुष्याच्या वाटचालीच्या आलेखाचे मूल्यमापन करतात. विशेषत: गांधींच्या त्यांच्या वडिलांशी असलेल्या संबंधावर एरिक्सन यांचा भर आहे. त्यासाठी गांधींच्या "आत्मचरित्रा"चा (*Autobiography*) आधार घेतात व त्यांच्या सान्नि-ध्यातील व्यक्तींच्या मुलाखतींची पुष्टी देतात. एरिक्सन आपल्या विश्लेषणाच्या वस्तुनिष्ठतेचा कितीही दावा करीत असले, तरी ते गांधींना एक पिता म्हणून आलेल्या त्यांच्या अपयशांबद्दल त्यांना ठपका लावतात; आणि याचे कारण गांधींचे त्यांच्या वडिलांशी जे अतर्क्य विकारी (pathological) स्वरूपाचे नाते होते, ते आहे असे ते ठरवितात. गांधींच्या आयुष्यातील एका प्रसंगाचे सूक्ष्म परिशीलन करून एरिक्सन आपले विश्लेषण संपवितात (दोन्ही अर्थाने): १९१८ मध्ये त्यांनी अहमदाबादच्या कामगारांच्या संपात जी मध्यस्थी केली तो प्रसंग. गांधींच्या अंर्तमनातील खोलवरच्या एका संघर्षाकडे ते आपले लक्ष वेधतात : तो संघर्ष म्हणजे एका बाजूला "पौरुषत्व" व दुसऱ्या बाजूला "संतत्व"; किंवा एका बाजूला पैतृक प्रजननक्षमता आणि दुसऱ्या बाजूला मातृक चिंतातूरता यांमधील संघर्ष. याला मनोविश्लेषणाच्या भाषेत मज्जारज्जू विकार (neurosis) असे म्हणता येईल; पण एरिक्सन ही गोष्ट एक व्यक्ती म्हणून गांधींच्या स्व-संरचनेचा पायाभूत भाग आहे असे मानतात. गांधींजींच्या "मातृक" स्वभावामुळे (अनेकांनी या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे) एरिक्सनना आर्ष मातृसत्ताक धर्माचा हिंदू जन-मानसावर असलेल्या प्रभावाचा परिपाक दिसतो. त्याचप्रमाणे पौरुषत्वाचे जे लष्करी प्रारूप आहे, त्याचे अवमूल्यन करून, लिंगभेद न मानता स्त्री-पुरुषांमधील नाते अधिक मुक्त व समान गुणविशेष ओळखण्याचे मार्ग उलगडतील या गोष्टीचे दृष्टांतात्मक भविष्य ते वर्तवितात.

एरिक्सनना गांधींच्या अंर्तमनातील या संघर्षामध्ये त्यांच्या अहिंसा व्रताचा स्रोत आढळतो. एरिक्सन यांच्या तीक्ष्ण बुद्धिसामर्थ्यामुळे त्यांचे पुस्तक इतर मामुली पुस्तकांहून निराळे आहे; पण त्यामध्ये व्यक्त झालेली अंतर्दृष्टीयुक्त माहिती पडताळून पाहिली गेलेली नाही आणि त्यामुळे त्यांचा हा प्रयत्न अयशस्वी वाटतो.

१९६९ मध्ये साजऱ्या केलेल्या गांधींच्या जन्म-शताब्दीमुळे साहित्यिक अंगाने लिहिलेल्या चरित्रांची एक लाटच आली. जेफ्री ॲश (G. Ashe, Gandhi, A study in Revolution, 1968) आणि रॉबर्ट पेन (R. Payne, The Life and Death of

Mahatma Gandhi, New york, 1969) यांनी अशा प्रकारची लिहिलेली चरित्रे दिसतात. जेवढ्या प्रमाणात गांधींना ख्रिश्चन संत ठरविण्याच्या प्रयत्नांना त्यांनी फाटा दिला आणि गांधींचा भारतीय संस्कृतीच्या संदर्भात विचार केला, तेवढ्या प्रमाणात त्यांचे निराळेपण दिसते; पण तरीही गांधींचा हिंदु धर्माशी असलेला संबंध कुठल्या प्रकारचा होता हा प्रश्न उरतोच. गांधींचे उदयाला येणारे दर्शन हे एका धर्मातीत राजकारण्याचे होते. राजकीय संघर्ष करण्यासाठी त्यांनी उपयोजिलेली कार्यपद्धती व त्यांच्या नेतृत्वाचा विशिष्ट प्रकार या गोष्टी त्यांच्या धार्मिक विचारांपेक्षा अधिक महत्वाच्या होत्या. जेफ्री अॅश यांच्या पुस्तकाचे उपशीर्षक "अ स्टडी इन् रेव्होल्यूशन" असे आहे; गांधींचे राजकीय चरित्र लिहिण्याचा हा ठोस प्रयत्न आहे असे म्हणता येईल; तर पेन यांनी लिहिलेल्या पुस्तकात अधिक व्यापक प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे. १९२० आणि १९३० या कालावधीत गांधी एक क्रांतिकारी होते, या समजुतीकडे परत वळण्याच्या प्रवृत्तीची पुनरावृत्ती झाली ती १९६० च्या दशकातील जी राजकीय परिस्थिती निर्माण झालेली होती त्याचेच ते निश्चितपणे प्रतिबिंब होते असे म्हणता येईल. काही विशिष्ट प्रकारच्या भूमिकांचे प्रत्यागमन आवर्तित स्वरूपात होणे हा चरित्र-लेखन या साहित्यशैलीचा नियमच आहे; विशेषतः त्याच त्याच विषयासंदर्भात असा लेखनप्रकार दीर्घकाळ उपयोजित केलेला असतो. तेव्हा वस्तुतः जवळ जवळ प्रत्येक दशकात गांधींचा नव्याने शोध घेतला गेलेला आहे; याचे कारण गांधींचे बहुआयामी व असामान्य बहुपेडी व्यक्तिमत्व. या दोन चरित्रलेखकांचा वस्तुनिष्ठ लेखन करण्याचा कितीही प्रयत्न असला तरी चरित्र विषयाबद्दलची त्यांना वाटणारी मोहिनी त्यांना टाळता न आल्याने गांधींच्या महाकाव्याला शोभणाऱ्या संघर्षाच्या पार्श्वभूमीवर ते विसाव्या शतकातील एक 'महानायक' होते असे त्यांचे वर्णन करण्याकडे त्यांचा कल होता.

१९७० व १९८० या दशकांमध्ये गांधींचे विचार व कर्तृत्व इ. अनेकविध पैलूंवर खूप पुस्तके प्रकाशित झाली; पण त्यामध्ये सर्वसाधारण चरित्रग्रंथ म्हणता येतील अशी फारच थोडी होती. १९८० च्या उत्तरार्धात गांधींचे एक नवीन प्रकारचे चरित्र लेखन पाहायला मिळाले; ते अधिक खोलात जाऊन अनुभवाधिष्टित लिहिले गेले होते. "Collected Works" पूर्ण झाल्यामुळे ते शक्य झाले आणि त्याचबरोबर कदाचित कालांतराचा परिणाम असेल, त्यामध्ये अधिक वस्तुनिष्ठ लिहिण्याच्या प्रवृत्तीचा प्रत्यय येतो. अशा प्रकारचे दोन चरित्रग्रंथ त्यामध्ये समाविष्ट केलेल्या नवीन वैशिष्ट्यांमुळे ठळकपणे आपल्यापुढे येतात; पण त्यांच्यामध्येसुद्धा अपुरेपणा अधिकच जाणवतो. तसेच गांधी अभ्यासामध्ये वाढणारी मौलिकताही आढळते. ज्यूडिथ ब्राऊन (J. M. Brown, Gandhi : Prisoner of Hope, New Haven - London, 1989) यांनी लिहिलेल्या चरित्र-ग्रंथामध्ये अधिक प्रगत ऐतिहासिक संशोधनाचा संयोग असून त्यातील एक अतिमहत्त्वाचा गुण म्हणजे त्यात गांधींच्या शेवटच्या वर्षातील जीवनावर योग्य प्रकारे लक्ष वेधलेले आहे; या कालावधीवर बहुतेक चरित्र-लेखकांचा दुर्लक्ष करण्याकडे कल असतो.

गांधींच्या या शोकपर्यवसायी अखेरच्या कालखंडावर ज्यूडिथ ब्राऊन भर देतात. या काळात "आशेचे बंदिवान" असलेल्या गांधींना फाळणीतील हिंसेचा साक्षीदार व्हावे लागले; त्यांच्या संपूर्ण जीवन कार्याचे खंडन झालेले पाहावे लागले. अर्थात गांधी अयशस्वी झाले या निर्णयाप्रत ज्यूडिथ ब्राऊन गेल्या नाहीत : त्यांच्या मते गांधींना एका अशा ऐतिहासिक परिस्थितीला सामोरे जावे लागले की, त्यामध्ये ते एक महत्वाची भूमिका बजावत होते पण त्यावर त्यांना मात करता आली नाही. या अभ्यासा-मधून गांधींचे संतस्वरूपापेक्षा मानवी स्वरूप प्रकट होते. हा चरित्रग्रंथ ऐतिहासिकदृष्ट्या बिनचूक व काटे-कोरपणे लिहिला गेला असला तरी, गांधींच्या जीवनातील सर्वंकश व्यामिश्रतेचा वेध घेण्यात लेखिका काही प्रमाणात अयशस्वी झालेली आहे. मार्टीन ग्रीन यांच्या प्रयासाबद्दलही असेच म्हणता येईल. (M. Green, Gandhi : Voice of the New Age Revolution, New York, 1993). व्हिक्टोरिया राणीच्या राजवटीच्या उत्तर कालखंडातील जो "नवयुगा" चा विचार बळावला होता, त्यांच्याशी गांधींचे जे गुंतागुंतीचे संबंध होते, त्याचा ऊहापोह करण्यावर मार्टीन ग्रीन यांचा भर होता : एडवर्ड कार्पेटर व लीओ टॉलस्टॉय यांनी औद्योगिक क्रांतीवर जे उग्र

स्वरूपाचे टीकालेखन केले होते, त्याचा या "नवयुगा" च्या विचारांमध्ये समावेश होतो. गांधींच्या या ध्येयवादावरील निष्ठेचा त्यांच्या विचारसरणीवर किती प्रभाव पडलेला होता आणि परिणामतः आधुनिकता व परंपरागतता यांचे चमत्कारिक मिश्रण त्यांच्यात कसे झाले होते, हे मार्टीन ग्रीन यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे : या वैचारिक मिश्रणाने त्यांच्या समकालिनांना नेहमीच बुचकळ्यात टाकलेले असायचे. एरिक एरिक्सन यांनी गांधींच्या पिता म्हणून केलेल्या प्रतिकूल मतांवरही ग्रीन यांनी टीका केलेली आहे; आणि गांधींच्या मनोवस्थेवर आपले असे वैकल्पिक विश्लेषण मांडलेले आहे. अलिकडे चरित्रलेखक गांधींच्या व्यामिश्र व्यक्तिमत्वाबद्दल अधिक जागृततेने लिहितांना दिसतात आणि म्हणून त्यांचे महान कार्य अधिक वास्तववादी प्रकाशात अवलोकन करतात.

सर्व दृष्टीने पाहिले असता, उपलब्ध असलेल्या गांधी-चरित्रांची संख्या ही निराशाजनक वाटते. उल्लेखनीय अशी काही थोडी पुस्तके सोडली, तर गांधीचरित्र नवीन अभिजात दृष्टिकोणातून क्वचितच लिहिलेले दिसते. बहुतेक चरित्रग्रंथ गांधींच्या "आत्मचरित्रा"तील त्याच त्याच प्रसंगांचा उपयोग करीत, काही इकडच्या तिकडच्या तपशीलांची भर टाकून, जुन्याच गोष्टींची कंटाळवाणी पुनरुक्ती करीत असताना आढळतात. त्यांमध्ये साहित्यिक गुणसंपदा व आकलनाची गहनता ज्यांच्यात आहे अशी सर्वात मौल्यवान पुस्तके संतचरित्रलेखनापासून स्वतःला दूर ठेवणारी आहेत; अशा संतपणावर भर देणाऱ्या चरित्रांचेच या क्षेत्रात वर्चस्व राहिलेले आहे. पण तरीही या अतिशय व्यामिश्र आणि अंतर्विरोध असलेल्या व्यक्तीभोवती निर्माण होणाऱ्या सर्वच प्रश्नांना समाधानकारक उत्तरे यातील काही बऱ्यापैकी असणारी पुसतके सुद्धा देत नाहीत. खऱ्या अर्थाने समाधान देणारी व निर्णायक स्वरूपाचे असे गांधींचे चरित्र आपल्याला मिळणे जवळजवळ दुरापास्त आहे असे म्हणायला प्रत्यवाय नसावा. असे का होते हे समजून घेण्याचा आपण प्रयत्न करणे इष्ट.

**गांधी आणि 'चरित्र' ह्या साहित्य प्रकाराच्या मर्यादा**

गांधींच्या चरित्रलेखनासंबंधी एक महत्त्वाची अडचण म्हणजे गांधींचे 'महा-इतिहासात' (high history) उशिरा झालेले पदार्पण : त्यावेळी ते अंदाजे पन्नास वर्षे वयाचे होते. त्यांच्या पूर्वायुष्यात असे काहीच नव्हते की, ज्यामुळे या पर्दापणाचे भाकित करता आले असते. या अर्थाने गांधीचा चढता आलेख विसाव्या शतकातील इतर राजकारण्यांपेक्षा वेगळा आहे. त्यांचे जीवनचरित्र तीन भागात विभागता येते, आणि ते भाग स्पष्टपणे वेगवेगळे दिसतात ते असे :

त्यांचे बालपण आणि यौवन दक्षिण आफ्रिकेस प्रयाण करीपर्यंत; १८९३ ते १९१५ पर्यंतचे दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्य; आणि १९१५ ते १९४७ भारतातला कालावधी. या तिन्हीतून जाणारा धागा सहजासहजी दृष्टीला पडत नाही. आपल्या स्वतःच्या *Autobiography* च्या प्रस्तावनेत त्यांनी आपले जीवनचरित्र एक सलग कथानक म्हणून लिहिता येईल या गोष्टीचे खंडन केले आहे. आपले जीवन म्हणजे एक 'सत्याचे प्रयोग' असून, ती अखंड रचना नाही असे त्यांचे स्वतःचेच आकलन आहे. आज अस्तित्वात असलेले चरित्रग्रंथ हे अलग अलग तुकड्यांचे एकत्रीकरण आहे असे आपल्याला जाणवत असले तर ते पुराव्याचा अभाव अगर चरित्रलेखकांचे अज्ञान नसून गांधींच्या तुटक तुटक आयुष्यक्रम असलेल्या व्यक्तिमत्वाचे ते प्रतिबिंब आहे. कदाचित गांधींचे उदाहरण हे एक प्रतिमान (paradigm) आहे असे म्हणता येईल : सर्व मानवांचे जीवनच अशा तुकड्या तुकड्यांनी घडत असते; आणि जी सकृतदर्शनी सलगता जाणवत असते ती मोठ्या प्रमाणात अशा प्रकारच्या निवेदनांची (narratives) एक कौशल्यपूर्ण संरचना असते. गांधींच्या संदर्भात तर एक साहित्यिक प्रकार या अर्थाने त्यांचे चरित्र हे सर्वात अधिक काटेकोर कसोटीला लावले जात असताना बालपणापासून ते यौवनापर्यंतची व्यक्ती एका बाजूला व एक प्रगल्भ प्रौढ व्यक्ती दुसऱ्या बाजूला यामधील सलगता प्रस्थापित करणे अवघड आहे. तरुणपणातील गांधींमध्ये एक खंबीर व्यक्तिमत्व असल्याच्या खुणा दिसत नाहीत;

किंबहुना, सामाजिक जीवनात सरावले नसल्यासारखेच ते वाटतात; तेच प्रौढ गांधी मात्र एक इतके असाधारण खंबीर व्यक्तिमत्व होते की, ते विक्षिप्तही वाटावे.

म्हणून गांधींच्या जीवनातील त्यांचे बालपण व तारुण्य ह्या गोष्टी तुलनेने अस्पष्ट राहिलेल्या आहेत. आपल्या आत्मचरित्रामध्ये गांधींनी या गोष्टींचे वर्णन करण्यात फार थोडी पृष्ठे खर्ची घातलेली आहेत; त्यांच्या अल्पवयीन विवाहावर मात्र त्यांनी प्रकाशझोत टाकलेला आहे; ती एक भयंकर घोडचूक होती असे त्यांना वाटले; पण त्याचवेळी त्यांचे व्यक्तिमत्व समजून घेण्यासाठी उपयोगी पडतील अशा बाजूंकडे मात्र त्यांनी दुर्लक्ष केलेले आहे. प्यारेलाल (Pyarelal, *Mahatma Gandhi : The Early Phase*, Ahamadabad, 1965) यांनी लिहिलेल्या ग्रंथामध्ये काही अधिक माहिती मिळते हे खरे, कारण त्यामध्ये कुटुंबियांच्याकडून मिळालेल्या साक्षी पुराव्याचा उपयोग केलेला आहे; पण तरीही सर्व गोष्टींचा विचार करूनही हा कालखंड गूढमय राहिलेला आहे. बरेचसे चरित्रलेखक तो भाग गाळूनच टाकतात. (ज्युडिथ ब्राऊनने आपल्या ४०० पानांच्या पुस्तकात २० पृष्ठे दिलेली आहेत) चरित्र लेखकांची ही अडचण इतिहास लेखनशास्त्र (historio-graphical) या स्वरूपाची आहे. आधुनिक भारतीय इतिहासाच्या लेखकांनी भारताच्या ज्या भागावर प्रत्यक्ष वासाहतिक राज्य होते त्या भागावरच आपले लक्ष केंद्रित केले आहे; त्याचवेळी ज्यांच्यावर अप्रत्यक्षपणे राज्य होते अशा शेकडो संस्थानांकडे तौलनिकदृष्ट्या दुर्लक्ष केले आहे. यामुळे महात्म्याने ज्या राजकीय-सामाजिक संदर्भात आपले बालपण व तारुण्यातील काही काळ व्यतीत केला त्याचे पुनश्चित्रण करणे हे अवघड होऊन बसते. त्यांच्या जवळच्या कौटुंबिक वातावरणावर खूप लक्ष केंद्रित केले गेले आहे. विशेषतः गांधींचे माता-पिता यांच्यावर; त्यामुळे विस्तृत संदर्भाकडे दुर्लक्ष केले गेले आहे. यासाठी एका सूक्ष्म ऐतिहासिक दृष्टिकोणाची आवश्यकता असते.

गांधींच्या पुरते बोलायचे झाले तर त्यांनी आपल्या इंग्लंडमधील वास्तव्यावर विस्तृतपणे लिहिले आहे; त्यामुळे त्यांच्या चरित्रलेखनात या गोष्टीला महत्त्वाचे प्राधान्य दिले गेले आहे. पण त्यांच्या वर्णनामध्ये त्यांनी काही छोट्या गोष्टींना प्रमाणाबाहेर महत्त्व दिले आहे; त्यामुळे त्यांच्या बौद्धिक व व्यावसायिक प्रगतीसंबंधी तपशिलावर माहिती मिळण्यास ते हानिकारक झाले आहे. परिणामतः चरित्रलेखकांनी त्यांच्या कायद्याकडे पाहाण्याच्या विशिष्ट दृष्टिकोणाकडे फार लक्ष दिलेले नाही. काटेकोरपणे कायदेकानून पाळण्याबद्दल त्यांना असलेला आदर, तद्वतच त्यांच्या दृष्टिकोणातून अन्यायी असलेल्या कायद्यांना त्यांचा प्रखर विरोध, या अंतर्विरोधाचे त्यांनी विश्लेषण करण्याचा प्रयत्न केलेला नाही. त्यांच्या संबंध कारकिर्दीचे हे तर वैशिष्ट्य होते.

तथापि गांधींच्या आयुष्यातील खरे 'कृष्णविवर' कुठले असेल तर त्यांचे दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्य. त्यासंबंधी योग्य दस्तऐवज उपलब्ध असून सुद्धा. गांधीनी स्वतः त्या कालखंडासंबंधी दोन वेगवेगळे वृत्तांत लिहिलेले आहेत. त्यांनी लिहिलेल्या Satyagraha in South Africa (M. K. Gandhi, Ahmedabad, 1928; Gujarati Edition 1924) मध्ये पुरेसा वास्तववादी मजकूर आहे; व Autobiography मध्ये स्वतः दक्षिण आफ्रिकेत व्यतीत केलेल्या काळावर २०० पृष्ठांमध्ये स्वतःचे व्यक्तिगत आकलन लिहिले आहे. पण हे वृत्तांत त्यांनी १९२० मध्ये लिहिले; म्हणजे दक्षिण आफ्रिका सोडल्यानंतर खूप वर्षांनी. सर्वस्वी आपल्या स्मृतीवर अवलंबून; कुठल्याही लिखित मजकुराची मदत न घेता. अशा तऱ्हेच्या आठवणी दुसऱ्या कुठल्याही पुष्टीकारक पुराव्याविना लिहिलेल्या असल्यामुळे गंभीर शंका उपस्थित होतात. विशेषकरून दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांची स्वतंत्र माहिती मिळत नाही ही एक समस्या आहे. एका बाजूला उपलब्ध असलेला दक्षिण आफ्रिकेतील आणि ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या दप्तरामधून मिळणारा विपुल दस्तऐवज, जो काही विशिष्ट विधानांना पुष्टी देतो तर काहींना रद्दबातल ठरवितो; आणि दुसऱ्या बाजूला वृत्तपत्रातील मजकूर व हेन्री पॉलॅक व त्यांच्या पत्नी अशा गांधींच्या युरोपियन मित्रांनी लिहून ठेवलेला मजकूर ज्या मुस्लिम व्यापाऱ्यांशी गांधींचा जवळचा

संबंध आलेला होता त्यांना गांधीविषयी काय वाटत होते याबद्दल जवळ जवळ काहीच माहिती मिळत नाही. कारण सकृत्‌दर्शनी तरी त्यांनी लिखित स्वरूपाचा मागमूसही मागे ठेवलेला नाही. दोन चरित्र लेखकांचा अपवाद वगळता बहुतेक सर्व लेखकांनी गांधींनी कथन केलेला मजकूर शहानिशा न करता जसाच्या तसा अनुसरला आहे.

परिणामतः गांधींच्या आयुष्यातील या निर्णायक कालखंडामध्ये एका संकोची स्वभावाच्या २४ वर्षे वयाच्या वकीलाचे दर्बनमध्ये आगमन होते आणि वयाच्या ४५ वर्षी त्याच वकीलाचे एका प्रगल्भ अशा बुद्धिवादी सक्रिय कार्यकर्त्यामध्ये रूपांतर होते – असा हा कालखंड बहुतांशी छाननीच्या बाहेर राहिलेला आहे; अशा तऱ्हेची गांधींच्या उत्तरकालीन जीवनाची सतर्क छाननी भारतात केली गेली आहे. या २३ वर्षांच्या कालावधीत गांधींनी किमान असे दोन निर्णय घेतले की, त्यांचा त्यांच्या आयुष्यक्रमावर निर्णायक असा परिणाम झालेला दिसतो: ते निर्णय म्हणजे, एक : गांधींनी स्वतःला पूर्णवेळ सार्वजनिक कार्याला वाहून घेणे, व दोन : पत्नीशी असलेले लैंगिक संबंध थांबविणे व कौटुंबिक जीवनाचा पूर्ण त्याग करून सामुदायिक जीवनाला वाहून घेणे. गांधींचे व्यक्तिमत्व योग्य प्रकारे समजून घेण्याच्या दृष्टीने हा कालखंड किती महत्त्वाचा आहे या गोष्टीवर यापेक्षा अधिक भर देण्याची गरज नाही. आणि तरीही गांधींनी स्वतः लिहून ठेवलेली निवेदने व काही चरित्र लेखकांनी आपल्या संशोधनाची व्याप्ती वाढविण्याचा प्रयत्न करूनही गांधींच्या या निर्णयामागील अंतस्थ प्रेरणा कुठल्या होत्या यासंबंधीची माहिती आपल्याला चकवते हे खरेच.

मुख्य समस्या ही संदर्भीकरणाची आहे असे म्हणता येईल. महात्म्याच्या भारतीय, ब्रिटिश व अमेरिकन चरित्रलेखकांच्या दृष्टिकोणातून दक्षिण आफ्रिकेतील १९ व्या शतकातील व विसाव्या शतकाच्या आरंभीच्या काळात वासाहतिक समाज हे एक इतके दूरचे विश्व आहे की, ज्या परिस्थितीत गांधीना ज्या महत्त्वाच्या निवडी कराव्या लागल्या त्या तत्कालीन परिस्थितीचे पुनःचित्रण करण्यासाठी मोठ्या प्रतिभेची गरज आहे. त्यामुळे अधिकांश चरित्रलेखकांना गांधींनी स्वतःच दिलेली संक्षिप्त स्पष्टीकरणे स्वीकारायला सोपे वाटले. गांधींच्या कथनाचा सगळा भर प्रत्यक्ष दडपशाहीला तोंड द्यावे लागणाऱ्या एका व्यक्तीच्या सद्‌सद्‌विवेकबुद्धीला जाणवणाऱ्या द्विविध (dilemmas) पर्यायांवर आहे. आत्मशुद्धीकरणाच्या प्रक्रियेमध्ये निस्पृहपणे सार्वजनिक सेवा करण्याची यदृच्छेनेच आपल्याला प्रेरणा मिळाली असे दर्शविण्याचा गांधींचा प्रयत्न आहे; पण त्यासाठी त्यांना खोल असा आध्यात्मिक संघर्ष उत्प्रेरक (catalyst) झाला हे खरे. अशा तऱ्हेच्या आध्यात्मिक संघर्षाची फलनिष्पत्ती सार्वजनिक सेवेची निवड करताना तुलनेने सुप्रतिष्ठित असणाऱ्या व्यापारी वर्गाच्या हितासाठी का करावी, असा प्रश्न उपस्थित करता येईल. कारण एक गोष्ट लक्षात ठेवायला हरकत नाही की, दक्षिण आफ्रिकेतील जो मान्यवर (elite) भारतीय समाज होता त्यामध्ये बहुतांशी गुजरातेतले मुस्लिम व्यापारी होते; आणि १९०६-०७ मध्ये गांधींचे कार्य मुख्यतः या छोट्या प्रतिष्ठित समाजाच्या भोवतालच्या परिस्थितीशीच निगडित होते. फक्त १९१३-१४ मध्येच दक्षिण आफ्रिकेतील विशेषतः नाताळ प्रांतातील बहुसंख्येने असलेल्या भारतीयांच्या प्रश्नाकडे ते वळले. या शेवटच्या सत्याग्रहाच्या मोहिमेत त्यांनी भारतीय गिरमिट्याच्या कराराची मुदत संपल्यानंतर त्यांच्यावर जो तीन पौंडांचा कर लादलेला होता तो रद्द करण्याचे उद्दिष्ट त्यांनी आपल्या चळवळीच्या कार्यक्रमात समाविष्ट केले. दक्षिण आफ्रिकेतील पहिली १५ वर्षे त्यांच्या वास्तव्याची उद्दिष्टे गुंतागुंतीची होती आणि त्यांमध्ये कालगतीप्रमाणे बदल होत गेले असावेत. माझ्या माहितीप्रमाणे फक्त दोन लेखकांनी या बाबतीत प्रश्न उपस्थित करण्याचे धाष्टर्य दाखविलेले आहे. ते म्हणजे 'मूर्तिभंजक' गांधीवादी असलेले टी. के. महादेवन (T. K. Mahadevan, *The Year of the Phoenix*, Delhi, 1982) यांचे पुस्तक गांधींच्या दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्यावर आहे; आणि दुसरे दक्षिण आफ्रिकन इतिहास लेखिका मॉरिन स्वॉन (M. Swan, *Gandhi, The South African Experience*, Johannesburg, 1985) यांचे गांधी








आणि दक्षिण आफ्रिकेतील भारतीय या विषयावर लिहिलेले पुस्तक. या लेखिकेने लिहिलेल्या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी दक्षिण आफ्रिकेतील भारतीय प्रतिनिधी स्वतःच्याच इतिहासाचे माध्यम कसे बनले या विषयावर केलेली टिपणी हे आहे. बहुतेक लेखकांनी महात्म्याच्या दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्याचे वर्णन हे शुद्ध "गांधी केंद्रित" केलेले आहे; त्यामध्ये इतर देशवासीय केवळ पार्श्वभूमीसारखे वर्णिलेले आहेत; किंवा फार तर भविष्यकाळात होणाऱ्या एका थोर महापुरुषाचे प्रशंसक म्हणून. अशा पार्श्वभूमीचे एक छान उदाहरण म्हणून जेफ्री ॲश यांच्या इतर दृष्टींनी रोचक असलेल्या पुस्तकाचा उल्लेख करता येईल. "या नाट्यामध्ये पूर्ण रेखाटलेली व्यक्तिरेषा नेहमीच प्रकाश-झोतात असते. गांधी हे प्रमुख विभूती आणि त्यांचे बहुतेक सहकारी सदिच्छा आणि उत्साहाने ओथंबलेले; त्यांची फक्त नावेच आहेत." तरीसुद्धा याच लेखकाला एक असा शेरा मारावा लागला आहे की, एखाद्या कुणाला भारतीय व्यापाऱ्यांची भेट घेतल्याचा अनुभव असेल त्याला भारतीय व्यापारी इतके छायास्वरूप राहावेत हे पटणे कठीण आहे; मला अशीच वर्णने बहुतेक चरित्रलेखनांमध्ये आढळतात. त्यांची छायास्वरूपता ही सोपेपणाने व चुकीने गृहीत धरलेली आहे. याचे कारण त्यांनी लिखित स्वरूपाचे साक्षी पुरावे मागे ठेवलेले नाहीत ही वस्तुस्थिती आहे. गांधींच्या पुरते बोलायचे झाल्यास त्यांच्या मग्न व अंतर्मुख अवस्थेत इतरांसाठी ते देऊ शकत होते तो अवकाश मर्यादित होता. (तरीही गांधींनी आपल्या एका सहकारी कार्यकर्त्याचा उल्लेख केलेला आहे; ते म्हणजे शेठ कच्छालिया नावाचे मुस्लिम व्यापारी; त्यांचा उल्लेख *Satyagraha in South Africa* मध्ये केलेला आहे.) असे म्हणता येईल की, दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांना गांधींनी घडविले असल्याच्या शक्यतेपेक्षा, भारतीय समाजानेच त्यांना घडविले असण्याची अधिक शक्यता आहे. एक कार्यकर्ता व ज्या समाजात ते कार्य करीत तो समाज, दोहोमधील देवाणघेवाणीचे ते प्रारूप आहे. हे आज प्रभावित असलेल्या एकतर्फी प्रारूपांपेक्षा जास्त पटण्यासारखे आहे.

मॉरिन स्वॉन यांनी आपले पुस्तक प्रसिद्ध केले त्यावेळी ते दुर्दैवाने काहीसे दुर्लक्षित झाले होते; पण या पुस्तकात अशा तऱ्हेच्या अन्योन्य संबंधाची आपल्याला अधिक चांगली माहिती मिळते. नाताळ प्रांतातल्या भारतीय व्यापाऱ्यांनी एक प्रारंभिक संघटना काढण्यासाठी ('दि दर्बन इंडियन कमिटी') गांधींची वाट पाहिलेली नव्हती; त्यांनी आपल्या हक्कांच्या संरक्षणासाठी आणि गोऱ्या लोकांच्या ताब्यात स्थानिक स्वराज्याचा अधिकार देण्याच्या विरोधात १८९१ च्या जानेवारीतच एक मोहीम सुरू केलेली होती. (आपल्या विरुद्ध भेदभाव करण्यातच त्याची परिणती होणार हे त्यांचे भविष्य खरेच ठरले.) नाताळमध्ये १८९३ साली ज्यावेळी स्थानिक स्वराज्य स्थापन झाले, त्यावेळी भारतीय व्यापाऱ्यांना आपली संघटना कायम स्वरूपी कार्यक्रम चालविण्यासाठी एका पूर्णवेळ संघटकाची गरज भासली. गांधींना इंग्रजी व गुजराती भाषांचे चांगले ज्ञान असल्या कारणाने, शिवाय त्यांना ब्रिटिश कायदेकानूनचा परिचय असल्याने, अशा कामासाठी सर्वार्थाने ते योग्य होते. १८९४–१९०६ मध्ये भारतीय व्यापारी समाजाचे प्रतिनिधी म्हणून ते निवडले गेले. नाताळ आणि ट्रान्सवाल प्रांतातील वासाहतिक अधिकाऱ्यांच्या भेदनीतीची तीव्रता कमी करण्याच्या कामी संघर्ष करण्यासाठी गांधींची नेमणूक करण्यात आली. त्यांचे सार्वजनिक कार्य म्हणून या पलीकडे त्यांनी काही अधिक करण्यासंबंधी सूचक असे काही मिळत नाही. एक साधे प्रतिनिधी म्हणून गांधींचे एका नेत्यामध्ये जे १९०६–०७ मध्ये आकस्मिक रूपांतर झाले त्यामध्ये गांधींचा स्वतःचा पुढाकार जितक्या प्रमाणात होता तितक्याच प्रमाणात समाजाचा प्रतिसादही महत्त्वाचा होता. ट्रान्सवालमधले भारतीय समाजाचे वाढणारे संघटन आणि गांधींचे उत्क्रांत होऊ लागलेले राजकीय विचार या दोहोमध्ये द्वंद्वात्मक तार्किक पद्धतीचे (dialectical relationship) संबंध होते; हा समाज उच्च व्यापारी (elite) वर्गाच्या सीमारेषा ओलांडून अधिक मोठ्या फिरत्या विक्रेत्या गटाला आपल्यात सामील करून घेण्याच्या वृत्तीचा होता.

विसाव्या शतकाच्या सुरूवातीला गांधींची व्यक्तिगत तत्त्वधारणा ही रस्किन व टॉलस्टॉय या दोघांच्या प्रभावाखाली आकारलेली होती. त्यांनी आपल्या विचारांचे

राजकीय कार्यक्रमात रूपांतर करण्याची शक्यता आजमावली. व्यापारी वर्गाची गट करून राहण्याची वृत्ती व सार्वजनिक हिताबद्दलचे औदासिन्य या मर्यादांचे उल्लंघन करणे गांधींना अधिकाधिक आवश्यक वाटू लागले होते; त्याचबरोबर राजकीय कार्यक्षेत्रात नैतिकतेचे महत्त्व जाणून त्यावर विश्वास ठेवणारा कार्यकर्त्यांचा एक खास गट निर्माण करण्याची गरज भासू लागली. १९०८ पासून केलेल्या पहिल्या सत्याग्रहात, गांधींनी आपल्या चळवळीला गती देण्याचे साधन म्हणून आपल्या नैतिक नेतृत्वाचा प्रयोग केला; त्यात ते यशस्वी झाले. त्यामुळे व्यापाऱ्यांच्या मूळच्या चळवळीपलीकडे जाऊन त्यांना आपल्या आवाहनाचा विस्तार करणे शक्य झाले. या आपल्या चळवळीच्या कालावधीत गांधी सत्याग्रहाच्या तात्त्विक चौकटीत बसणारी तत्त्वे अधिकाधिक स्पष्ट करीत गेले. परिणामतः हा जो बदल घडून आला त्याचे मुख्य कारण म्हणजे ट्रान्सवालमधल्या भारतीयांच्या सामाजिक परिस्थितीशी त्यांचा आलेला द्वंद्वात्मक तार्किक संबंध हे होय. केवळ आध्यात्मिक भाषेत त्याची कारणमीमांसा करता येणार नाही; पण तशी कारणमीमांसाच फक्त शक्य आहे अशी बहुसंख्य वाचक आणि बहुतांश चरित्रकर्ते यांची गांधींनी स्वतः दिलेल्या स्पष्टीकरणावरून खात्री झालेली दिसते.

सत्याग्रहाच्या या प्रयोगाच्या शोधामुळे गांधी भारतात परत जाऊन राजकीय चळवळीत सहभागी होण्याचा विचार करू शकले. १९१३ मध्ये राजकीय क्षेत्रात परिपक्वता प्राप्त होण्याच्या प्रक्रियेत गांधींचे एक निर्णायक पाऊल पडले. नाताळ मधल्या उच्च वर्गीयांचा विरोध व निस्तेज होत गेलेल्या चळवळीच्या संदर्भात हे घडले. गांधींनी अपल्या चळवळीचे आवाहन विस्तारले आणि त्यामध्ये विशिष्ट करारनाम्यावरून आलेल्या कामगारांच्या गटांना "गिरमिट्यांना" सामील करून घेतले; त्यामध्ये न्यूकासलमधल्या कोळसा-खाण कामगारांचाही समावेश होता. त्यांच्यामध्ये गांधींना आपली चळवळ चालविण्यासाठी आवश्यक असलेला दृढनिश्चयी आणि भक्कम असा गट मिळाला. कामगारांकडून गांधीना मिळालेल्या प्रतिसादाचे अंशतः कारण म्हणजे व्यापारी वर्गाचा तडजोडी करण्याकडे कल पाहिल्यावर त्यांना चळवळीत ओढण्याच्या प्रयत्नात त्यांना वाढती अडचण जाणवू लागली. अंशतः गांधींचे दूरदृष्टी क्षेत्र (vision) व राजकीय कार्यक्रम यांच्यात जो बदल झाला त्याचे दक्षिण आफ्रिकेतील सामाजिक परिस्थितीला उत्तरदायित्व देणे किती महत्त्वाचे आहे ही गोष्ट आपल्याला स्वान यांच्या उत्कृष्ट पुस्तकाच्या आधारे समजते.

भविष्यातील गांधी-चरित्र-लेखकांना दक्षिण आफ्रिकेतील भारतीय समाजाबद्दल असलेल्या अधिकाधिक अशा उपलब्ध होणाऱ्या साहित्याची दखल घ्यावीच लागेल. इथे एक अतर्क्य विकारवश (pathologically) संकोची असलेल्या तरुण वकीलाचे जमावाला उद्देशून भाषण करणाऱ्या व त्यांचे नेतृत्व करणाऱ्या पुढाऱ्यात रूपांतर झाले. एक गोष्ट स्पष्ट आहे की, महात्म्याच्या जीवनात अजूनही अशा पुष्कळ अज्ञात जागा आहेत. एक सामान्य वकील महात्मा होतो हे ज्या प्रक्रियेने घडले ते गूढमयच आहे. त्यातील काही भाग गांधींच्यामुळेच उद्‌भवलेला आहे; त्यांची *Autobiography* मागे राहिलेल्या पाऊलखुणा झाकण्याचा प्रयत्न करते व त्यांच्या वर्धिष्णू आलेखाला भौतिक कसोट्या लावण्याच्या प्रयत्नाला परावृत्त करीत गांधींच्या मिथिकाचा उगम गांधीमध्येच होतो.

**स्वतःच्या चरित्राचे लेखक : गांधी**

त्यांच्या *Autobiography* वर रोमाँ रोलाँ या गांधींच्या मित्राने लिहिलेल निबंध वाचल्यानंतर गांधींनी त्यांना २२ मार्च १९२४ ला लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे : "तुमच्या निबंधात तुम्ही थोड्या चुका केलेल्या आहेत हे फारसे महत्त्वाचे नाही. माझ्यापुरते बोलायचे तर तुम्ही इतक्या थोड्या चुका केलेल्या आहेत हे आश्चर्यच आहे. कारण तुम्ही एका वेगळ्या व दूरच्या परिसरात राहून तो लिहिलेला आहे; आणि तरीही माझ्या संदेशाचे आकलन तुम्ही इतक्या सच्चेपणाने करण्यात यशस्वी झालेले आहात." असे असले तरी पाश्चात्त्य जगातील एका मोठ्या लब्धप्रतिष्ठित विचारवंताने गांधींना बहाल केलेला सन्मान गांधींनी कृतज्ञपणे स्वीकारलेला असला तरी, आपल्याबद्दलच्या वदंतांना आळा घातला पाहिजे अशी इच्छा ते दर्शवितात. अर्धवट विनोदाने गांधी म्हणतात की, रोमाँ रोलाँच्या पुस्तकातील चुका








सुधारण्यासाठी आपण *Autobiography* लिहिली. खरे तर त्यांनी ती ते तुरूंगात असतानाच त्यांच्या दोन सहकाऱ्यांच्या आग्रहास्तव लिहावयाला घेतलेली होती. पहिल्यांदा आपल्या 'नवजीवन' या पत्रकात लेख-स्वरूपात आत्मचरित्र क्रमशः प्रसिद्ध झाले आणि नंतर माधव देसाईनी गुजरातीतून ते इंग्रजीमध्ये अनुवादित केले आणि पुस्तक स्वरूपात ते १९२७ मध्ये प्रसिद्ध झाले. हे असामान्य पुस्तक केवळ रोमाँ रोलाँना उत्तरादाखल लिहिले असण्यापेक्षा निश्चितच अधिक काही आहे. गांधींनी स्पष्ट केले होते की, ते काही आत्मचरित्र लिहित नव्हते; कारण हा साहित्यप्रकार पाश्चात्त्य होता असे त्यांचे मत होते. ते फक्त "सत्याच्या प्रयोगांची" एक मालिका लिहित होते आणि ह्या प्रयोगांद्वारे त्यांचे चरित्र आणि व्यक्तिमत्व घडलेले होते. आपल्या प्रास्ताविकात ते अधोरेखित करतात की, त्यांचे राजकीय क्षेत्रातील प्रयोग सर्वदूर माहित होते, अगदी भारतीय किनाऱ्याबाहेर देखील; आणि त्यामुळे त्यांच्यापुरते तरी त्यांचे महत्त्व मर्यादित होते. "पण आध्यात्माच्या क्षेत्रातील माझे प्रयोग मात्र मला निवेदन करावेसे वाटतात; कारण ते फक्त माझे मलाच ठाऊक आहेत; आणि त्यापासून राजकीय क्षेत्रात काम करण्यासाठी मला शक्ती प्राप्त झालेली आहे." कुठल्याही टिपणींच्या मदतीखेरीज केवळ स्मरणशक्तीवर अवलंबून लिहिल्या कारणाने पुस्तकाची संहिता एक विचारांची आणि किंवदंतींची एका मागोमाग येणारी मालिका आहे आणि तिचा उद्देश एका आत्मिक प्रवासाच्या पाऊलखुणा शोधण्याचा आहे; म्हणजेच जीवनातील भौतिक स्वरूपाचे सर्व अनुभव निवेदन करण्याचा नाही. सरळ रेषेतील असे ते निवेदन नसून त्यात अनेक वेळा विषयांतर केले गेलेले आहे. हे विषयांतरही वर्णनाचे अखंडत्व सहेतुक भंग करण्यासाठी केलेले आहे. कथित केलेल्या प्रत्येक घटनेमागील गूढार्थ वाचकाने वाचून त्यावर मनन करावे; त्याचप्रमाणे त्याने शब्दप्रवाहात वाहून जाऊ नये असा गांधीचा हेतू होता. आपल्याला जे प्रसंग महत्त्वाचे वाटतात तेच त्यांनी अशा तऱ्हेच्या रचनापद्धतीसाठी निवडले.

अशा तऱ्हेचा इशारा दिलेला असला तरी नंतरच्या भविष्यातील चरित्रांमध्ये उपरिनिर्दिष्ट संहिताच सत्य घटनांचे मुख्य स्रोत मानले जाईल हे गांधींनी सिद्ध केले. निदान १९२० पूर्वीच्या कालखंडापुरते तरी. (गांधींचे आत्मचरित्र या वर्षीच संपते). आश्चर्य म्हणजे गांधींची सर्वात अशक्य वाटतील अशी निवेदनेही चरित्रकारांनी चिकित्सा न करता स्वीकारली. त्यांच्या जीवनातील एका प्रसंगावर आपण लक्ष्य केंद्रित करूया : आपल्या पहिल्या मालकाबरोबरच्या (employer) कराराची मुदत १८९४ संपल्यावरही दक्षिण आफ्रिकेत पुढे राहाण्याचा गांधींचा निर्णय. त्यांच्या पहिल्या वहिल्या चरित्रकारांनी, व नंतर रोमाँ रोलाँनी, या घटनेचा अगदी साधा सरळ व न पटणारा अर्थ लावला : रोलाँनी लिहिले आहे :

"परत जाण्याची वेळ आली त्यावेळी ते परतण्यासाठी उतावीळ होते; त्याचवेळी भारतीय वंशाच्या लोकांचे शेवटचे मतदानाचे हक्कही काढून घेण्यासाठी सरकार एक विधेयक तयार करीत होते असे त्यांना समजले. दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांचे संघर्ष करण्याचे बळ नव्हते, इच्छाशक्ती नव्हती, ते असंघटित होते आणि मानसिक धैर्य गमाऊन बसलेले होते. त्यांना एका नेत्याची गरज होती, एका आत्म्याची. गांधींनी स्वतःलाच झोकून दिले. त्यांनी राहाण्याचे ठरविले."

तीस वर्षांहून अधिक कालानंतर, गांधींनी या घटनेचे असाधारण वाटावे इतक्या तपशिलाने स्वतःच्या स्मरणावर अवलंबून जे वर्णन केलेले होते, त्यावरून तरी त्या प्रसंगाच्या विश्वसनीयतेबद्दल शंका उपस्थित करता आल्या असत्या. त्यांनी दिलेला वृत्तांत असा होता : त्यांच्या मालकाने त्यांच्या सन्मानार्थ एक निरोप समारंभ आयोजित केलेला होता, त्याप्रसंगी गेलेले असताना वृत्तपत्रातील एक लेख गांधींच्या हाती पडला; त्यामध्ये नाताळच्या विधान सभेमध्ये 'स्वतंत्र' भारतीयांचा मतदानाचा हक्क काढून घेण्याचे एक विधेयक मांडले गेल्याचा उल्लेख होता. त्यामुळे सतर्क होऊन गांधींनी तिथे जमलेल्या भारतीय व्यापाऱ्यांना त्याबद्दल विचारले. त्या विधेयकासंबंधी व त्याचा मतितार्थ यासंबंधी त्यांना काहीच माहिती नव्हती. गांधींनी त्यांना ही अशी एका प्रक्रियेची नुसती सुरूवात असून, पुढे तिला जोम येऊन नाताळमधल्या भारतीयांना प्रसंगवशात कुठल्या असह्य प्रसंगांना तोंड द्यावे लागेल या गोष्टीचे विश्लेषण केले. त्यानंतर व्यापाऱ्यांनी उत्स्फूर्त-

पणे या विधेयकाला विरोध करण्यासाठी आपल्याला मदत करावी अशी गांधींना विनंती केली. त्यासाठी त्यांच्या सेवेबद्दल मोबदला देण्याचेही त्यांनी वचन दिले. गांधींना या प्रसंगात एक स्पष्ट दैवी संकेत जाणवला. "अशा तऱ्हेने दक्षिण आफ्रिकेतल्या माझ्या वास्तव्याचा परमेश्वरानेच पाया घातला, आणि राष्ट्रीय स्वकीयांसाठी झगडण्याचे बिजारोपण केले."

हे वर्णन अंतर्गत विरोधाभासाने भरलेले आहे; असा उल्लेख टी. के. महादेवन या लेखकाने आपल्या *The Year of the Phoenix* या 'मूर्तिभंजक' संहितेत लिहिलेला आहे. दर्बनमधले श्रीमंत व्यापारी त्यांच्याशी थेट निगडित अशा विधेयकाबद्दल अनभिज्ञ असावेत हे अतिशय असंभवनीय आहे. त्याचप्रमाणे आधी आपापसात याबद्दल चर्चा न करताच गांधींची नेमणूक करावयाची हेही अगदी असंभवनीय आहे आणि तरीही इतक्या अविश्वसनीय प्रसंगाचा तर्जुमा गांधींच्या जवळ जवळ सर्व चरित्रग्रंथात सापडतो. रॉबर्ट पेनसारख्या अत्यंत काटेकोरपणे लिहिणाऱ्या चरित्रकाराच्या १९६९ च्या गांधींच्या चरित्रात या प्रसंगाचे यथासांग वर्णन सापडते आणि वीस वर्षानंतर ज्यूडिथ ब्राऊनने या प्रसंगाचा गोषवारा दिलेला आहे. या घटनेचे गांधी एकटेच मूलस्रोत असल्याने, या चरित्रकारांनी निदानपक्षी आपले निर्णय सावधानपणाने प्रलंबित तरी ठेवायला हवे होते.

या मुद्याचे एवढे विवेचन करण्याचे कारण लेखकांना दोष देणे किंवा प्रत्यक्षज्ञानवादी (positivist) इतिहासाचे समर्थन करणे हा हेतू नाही; तर गांधींच्या जीवनाच्या माहितीचे ते स्वतःच व एकमेव मूलस्रोत होते असे वारंवार गृहीत धरणे व त्यांना तसे असाधारण अधिकारपत्र बहाल केले जाणे, याचा निर्देश करण्यासाठी हे विवेचन केले; आणि हे सगळे गांधींनी आपले आत्मचरित्र लिहितानाच नाकारलेले असताना. प्रश्न असा आहे की, गांधींच्या बाबतीतच सगळे अनुभवी चरित्रलेखक आणि इतिहासकार आपल्या चिकित्सक वृत्तीचा त्याग का करतात? अंशतः का होईना, हा दोष गांधींच्या जादूमय लिखाणातच आढळतो; त्याचे आकर्षण फारच थोड्यांना थोपविता आले आहे. गांधींचे निवेदन इतके पारदर्शक आणि सहज वाहणारे आहे की, ते "नव्या करारातील" (New Testament) काही परिच्छेदासारखे वाटते. महादेवभाई देसाईंच्या भाषांतरातसुद्धा हे जाणवते (तज्ज्ञांना ते भाषांतर असमाधानकारक वाटत असले आणि गांधींनी स्वतः त्यातला काही भाग सुधारला असला तरी); इतके की, ऐतिहासिक स्वरूपाचे प्रश्न उपस्थित करून त्याची सलगता भंग करण्यासाठी आपण डगमगतो; मग अशा गोष्टी अप्रस्तुत वाटतात.

गांधींचे लेखनकौशल्य समजणे हे नेहमीच सोपे नसते; पण ते असाधारणरित्या परिणामकारक असते. त्यांचे लिखाण तसे साधे असते; ते कठोरपणे संयमी असते; आणि तरीही ते आल्हाददायक असते. कारण ते इतके प्रत्ययकारी असते की, अगदी कठोर संशयात्म्यालासुद्धा ते आपल्या जाळ्यात ओढते. गांधींना भारतीय तसेच पाश्चात्त्य जनतेला आवाहन करण्याचे कसब छान जमले आहे; त्यांच्या गद्य लिखाणात विशिष्ट संदर्भातील दुपेडी शब्दावली (double register) ही परिचितही असते आणि अनोळखीही असते. सूक्ष्म वाचनानंतर असे दिसून येते की, आपल्या जीवनाचे ख्रिश्चन दृष्टिकोणातून आकलन केले जाऊ नये अशी त्यांची तीव्र इच्छा असून हिंदू मानसिकता (आध्यात्मिकता) ही आपल्या व्यक्तीमत्वाच्या अस्मितेच्या घडणीचा केंद्रबिंदू मानला जावा अशी त्यांची इच्छा होती. त्यांचा हा विशिष्ट हेतू, पाश्चात्त्य वाचकांना परिचित असलेल्या रस्किन व टॉलस्टॉय यांच्या बरोबरीने भारतीयांनाही फारशी माहिती नसलेल्या एका गुजराती कवीला – रायचंद मेहता – यांना आपल्या आध्यात्मिक गुरुंमध्ये त्यांनी समाविष्ट केले यावरून स्पष्ट होतो. आपल्याला विक्षिप्त वाटेल अशा वागणुकीने इतरांना चकित करण्यात गांधींना अप्रत्यक्षपणे आनंद वाटत असे. रायचंदभाईशी त्यांचे आध्यात्मिक नाते कुठल्या निश्चित स्वरूपाचे होते हे त्यांनी स्पष्ट केलेले नाही; तरीसुद्धा आपल्या धार्मिक जडणघडणीमध्ये गांधी त्यांना केंद्रस्थानी मानतात. ज्यावेळी त्यांच्या काही मित्रांनी त्यांना ख्रिश्चन धर्माची दीक्षा देण्याचा प्रयत्न केला त्यावेळी रायचंदभाईंनी लिहिलेल्या एका पत्रातील मजकुराने हिंदूधर्मावरील त्यांच्या डळमळीत श्रद्धेचे पुनरुज्जीवन केले; आणि हिंदू धर्मग्रंथ वाचण्यास त्यांना प्रवृत्त केले.

गांधींना आपल्या जडणघडणीचा प्रबुद्धतेकडे नेणारा जो चढता आलेख रेखाटायचा होता, तो धीम्या गतीचा होता. आपण एक सामान्य तरुण या अर्थाने परमेश्वरापासून दूर गेलेलो, काही वेळा भौतिक जीवनातील मोहांना बळी पडणारे, पण तरीही पाप-पुण्य यातील फरकाची तीव्र कल्पना असलेलो होतो असे ते आपले चित्र रेखाटतात. लंडनसारख्या विशाल महानगरात नैतिकतेच्या दृष्टीने अनेक धोके समोर होते; पण ते त्यापासून दूर राहिले; आणि शाकाहार व पवित्र हिंदू धर्मग्रंथांच्या शोधानंतर, आपल्या परंपरेतच राहून आत्मोन्नतीचा मार्ग अनुसरला. निरीश्वरवादाचा त्याग केला असला तरी, गांधी अजूनही परमेश्वरापासून दूर अंतरावर होते. दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्यकालात, ध्यानसाधना व प्रत्यक्ष कृती यांच्या माध्यमातून, दैवी कल्पना व साक्षात्कार याबद्दल संवेदनशील होत, क्रमाक्रमानें कमीतकमी सदोष राहाण्यात गांधी समर्थ झाले. या भागाच्या निवेदनात गांधींनी अंगीकृत केलेल्या सार्वजनिक कृती प्रासंगिक स्वरूपाच्या होत्या. अशा तऱ्हेने त्यांच्या राजकीय विचारसरणीत फरक पडल्याचे काही विश्लेषण आढळत नाही. किंवा ब्रिटिश राजवटीवरील त्यांचा विश्वास क्रमाक्रमाने ढळत गेल्याचेही विश्लेषण नाही. त्यांच्या आध्यात्मिक स्वरूपाच्या अंतर्गत गरजेतून त्या प्रत्यक्ष कृती केल्या गेल्या होत्या असे त्यांनी विशद केले आहे. गांधींनी आपल्या राजकीय कृतीची नैतिकता ही अमूर्त स्वरूपाच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन व्याख्यांकित केलेली नाही, तर आपल्या सदसद्विवेकबुद्धीला पटणाऱ्या विचारांनुसार केलेली आहे. बोअर युद्ध किंवा पहिले महायुद्ध या दोन्ही वेळी आपण ब्रिटिशांना पाठिंबा दिला होता याबद्दल त्यांनी खंत व्यक्त केलेली नाही; कारण त्या त्या वेळी आपल्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरूनच ते वागले होते.

स्वत:च्या खाजगी वागणुकीविषयी त्यांनी केलेली आत्मनिंदा आणि त्याचवेळी सार्वजनिक कृती करताना त्याबद्दल यत्किंचितही शंका घेण्याचा अभाव या दोहोमधला फरक आश्चर्यकारक आहे. जेव्हा गांधी आपली पत्नी व मुले यांच्या संदर्भात स्वत:ला कडक भाषेत झोडपायला हयगय करीत नाहीत, त्याचवेळी त्यांचे सार्वजनिक जीवन मात्र टीकेपासून दूर राहू शकते; आणि त्यावेळी आपण सर्वांत शुद्ध हेतूने प्रेरित असतो अशी ते आपली प्रतिमा नेहमीच सादर करतात. खाजगी व सार्वजनिक क्षेत्रांमध्ये आपण कधीच फरक करीत नाही असे ते म्हणत, त्या संदर्भात या दोहोतील विभाजन बुचकळ्यात टाकणारे आहे. त्यातील अन्युस्यूत अर्थ असा असे की, माणसांचा कुठलाही गट हा कमी अधिक प्रमाणात मोठ्या कुटुंबासारखाच असतो. गांधींनी मांडलेला विचार असा होता, की ते आपले खाजगी जीवन आदर्शवत् जगण्यात (आणि इथे कळीचा मुद्दा म्हणजे ब्रह्मचारी जीवन) यशस्वी झाले तर त्यांची सार्वजनिक कृतीही आदर्शवत् होईल. त्यांच्यापुढे प्रश्न होता तो असा की, आपले व्यक्तिगत नैतिकतेचे मापदंड राजकीय क्षेत्रात कसे उपयोजित करायचे. त्यांच्या मते हा आध्यात्मिक प्रश्न नसून तांत्रिक प्रश्न होता; आणि त्यासाठी आपल्याला सत्याग्रह हे यथायोग्य उत्तर सापडलेले आहे असे त्यांना वाटे. राजकीय क्षेत्रात 'प्रगती' ही संकल्पना त्यांच्याकडे नव्हती; प्रगतीची एकच शक्यता होती, आणि ती म्हणजे आध्यात्मिक प्रगतीची : जितक्या निष्ठूरपणे आपली ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा आपण पाळू शकू तितक्या प्रमाणात आपण अधिक उन्नत सत्याग्रही बनू शकू. तरीही जेव्हा ते लैंगिक अर्थाने स्खलन झाल्याचे मान्य करीत, त्याचवेळी राजकीय क्षेत्रात आत्मताडन करण्याकडे त्यांचा कल नसे – फार तर आपले अपयश आपल्या अपुऱ्या शुद्धतेमुळे होते असे ते मानत.

आपल्या पाऊलखुणा पुसून टाकायच्या असा गांधींचा प्रयत्न होता असे वाटल्यावाचून राहात नाही. गांधी हे एक ख्रिश्चन संत होते या सर्वदूर पसरलेल्या समजुतीचे खंडन करण्याची त्यांची धडपड आहे; कारण त्यासाठी ते अशा घटनांना महत्त्व देत की, ज्यामुळे त्यांची प्रतिमा फार उजळ दिसत नाही. त्यांच्या संदर्भात आत्मक्लेश (masochistic) दर्शविणाऱ्या प्रवृत्ती दिसतात या गृहीत प्रमेयाकडे दुर्लक्ष करता येणार नाही. त्यामुळे त्यांच्या धार्मिक वृद्धीचा आलेख हा विशेष गोंधळाचा वाटतो. आपल्यावर आपल्या ख्रिश्चन मित्रांचा

अनुक्रमणिका

प्रभाव आहे हे मान्य करूनसुद्धा हिंदू धर्मातील पवित्र ग्रंथांची आपल्यावर असलेली पकड अधिक घट्ट करण्याची ते पराकाष्ठा करीत. बुद्ध आणि ख्राईस्ट या दोघांमध्ये तुलना करण्यासाठी त्यांनी एक प्रसंगसुद्धा कथन केलेला आहे; त्यामध्ये बुद्ध अधिक उठावदार दाखविलेला आहे, कारण बुद्धाचे प्रेम सर्व प्राणिमात्रांवर होते; ख्रिस्ताचे मात्र मानवापुरते मर्यादित राहिले. ही निवड काही केवळ योगायोग म्हणता येणार नाही. कारण त्यांच्या पाश्चात्त्य चाहत्यांनी त्यांची जी ख्रिश्चन प्रतिमा सादर केलेली होती त्यापासून स्वतःला अलग ठेवण्याची गांधींची इच्छा स्पष्ट दिसते. हिंदूत्वाच्या टणक गाभ्यातील (hard core) अभिजात वृत्तींचे आपण संवर्धन करतो आहोत या स्वरूपात गांधींनी आपली धार्मिक मते विशद केलेली आहेत; पण त्याच वेळेला गांधींना धर्मसिद्धांत सुनिश्चित करण्यात कधीच रूची नव्हती. त्याचवेळी ते आपले व्यक्तिमत्व अशा तऱ्हेने रेखाटीत असत आणि प्रत्येक प्रसंगी नैतिक संकेतावर भर देत असत, पण त्यांचा हेतू पाश्चात्त्य वाचकाला आपल्या संतपणाबद्दल शंका निर्माण होण्यापासून निखालसपणे परावृत्त करण्याचा होता असे मात्र म्हणता येणार नाही. भारतीय वाचकांपैकी काही त्यांना देव मानत, अशांच्या संदर्भात एका बाजूने स्वतःमधल्या सर्व त्रुटी प्रदर्शित करावयाच्या, आणि दुसऱ्या बाजूने पारंपारिक हिंदूपासून स्वतःला अलग ठेवायचे – विशेषतः अस्पृश्य आणि मुसलमान यांच्या संबंधी, असे त्यांचे धोरण होते. आपल्या आध्यात्मिक प्रवासाचे निवेदन आपली संतपणाची बोधना बळकटच करू शकते, याची त्यांना चांगलीच कल्पना होती; पण या गोष्टीला प्रतिबंध करण्यासाठी त्यांनी काही केले नाही.

आपले "आत्मचरित्र" (Autobiography) लिहून गांधींनी भविष्यातील आपल्या जीवनचित्रणाचा ताबा आपल्याकडे ठेवला; तसेच आपल्या आध्यात्मिक शोधासंबंधीच्या आकलनावरही नियंत्रण राखले; जेणेकरून पुढे मागे कुणी त्याबद्दल प्रश्नचिन्ह उभे करू नये. गांधींनी लोकांना मुद्दाम चकविण्यासाठी हा प्रयत्न केला असा याचा अर्थ नाही. उलटपक्षी आपण आपला जीवन वृत्तांत देत नसून आपल्या फक्त आध्यात्मिक प्रवासाचा वृत्तांत देत आहोत; असे केल्याने आपल्या जीवनातील थेट वास्तव बाजूवर केंद्रित होणारी टीका त्यांनी आधीच रोखून धरली. तरीही हा इशारा म्हणजे एक आलंकारिक भाषा वापरण्याचा प्रकार होता असे वाटत राहतेच. कारण १९२७ साली गांधी काही नुसतेच दक्षिण आफ्रिकेतील 'गिरमिट्याच्या' गटाचे नेते नव्हते; तीस कोटी भारतीयांचे ब्रिटिश साम्राज्यशाही विरुद्ध झगडणारे सर्वमान्य नेते महात्मा गांधी होते, त्यामुळे त्यांच्या लिखाणाला अधिकारपणाचे एक विशिष्ट वलय होते. असे पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर त्यांचे उघड उघड राजकीय प्रतिस्पर्धी सोडले तर गांधींच्या जीवनाचा दुसरा-तिसरा अर्थ काढण्याचे धाडस कोण करू शकेल? एरिक एरिक्सन गांधी जीवनाचे विरचना (deconstruction) पद्धतीने मनोवैज्ञानिक तंत्र वापरून अभ्यास करण्याचा प्रयत्न करत होते; पण तेव्हा देखील त्यांना पायाभूत साहित्य मिळाले ते गांधींच्या Autobiography मध्येच. गांधींच्या जीवनाचे विरचना पद्धतीने नीटनेटके विवेचन करायचे म्हणजे, प्रथम कशाची गरज असेल तर ती म्हणजे "आत्मचरित्रा" ची जी मूळ संहिता (ur - text) होती तिचीच विरचना करणे आवश्यक आहे. ही अवघड गोष्ट सोडली तर, त्यांचे लिखाण आणि सार्वजनिक कृती इत्यादी समृद्ध साहित्य आहेच.

**संदर्भ :**

**१. क्लोद मार्कोव्हिट्झ्**

पॅरिसमधील सांत्र नात्मियोनाल द ला रेशर्श सियांतिफिक या संस्थेत ज्येष्ठ संशोधक आहेत. हा लेख मार्कोविट्झ यांच्या The Un-Gandhian Gandhi : The Life and After-life of the Mahatma या पुस्तकातील "The Impossible Biography of Mohandas K. Gandhi" या प्रकरणाचा अनुवाद आहे.










# काल, आज आणि उद्या

## नोआखली

— साक्षी

फाळणी झाली व स्वातंत्र्य मिळाले त्याला आता ६२ वर्षे झाली. या दीर्घ काळात आपल्या देशातील राहाणीमानात, आयुष्याकडून करावयाच्या अपेक्षात; समाजातील निरनिराळ्या घटकात असावयाच्या संबंधात, धर्म व जाती यांच्या विषयी असलेल्या धारणात अकटोविकट बदल घडून आला आहे. नवीन नवीन समस्या पुढे येत आहेत व लोकशाहीच्या, उदारमतवादाच्या आणि सहिष्णुतेच्या मर्यादा पाळून त्यांच्यावर तोडगा काढण्याचा सराव आपल्याला होतो आहे. आर्थिक, संरक्षणविषयक, प्राशासनिक, शिक्षणाच्या व समाजाच्या परिवर्तनाचे, स्त्रियांच्या प्रतिनिधित्वाचे, दलितांच्या व उपेक्षितांच्या हक्कांचे असे अनेक प्रश्न वेळोवेळी उभे राहतात. दहशतवाद, नक्षलवाद, पर्यावरणाची नासाडी, अमर्याद नागरीकरण, पाणी-वीज यांची टंचाई ही संकटे तर जीवन-मरणाचा निवाडा व्हावा इतक्या तीव्रतेला पोचली आहेत. इतके झाले असले तरी आपल्यातील विचारवंत, इतिहासवेत्ते, राजकारणी व पत्रकार फाळणी व तिच्या योगाने स्वातंत्र्याला लागलेला कलंक यांचा पुनःपुनः ऊहापोह करताना आढळतात. याचे एक कारण स्पष्टच आहे की, फाळणी आणि स्वातंत्र्य ही विसाव्या शतकात हिंदुस्थानाच्या इतिहासात घडलेली निर्णायक घटना होती; दुसरे असे की, पाकिस्तान व काश्मीर प्रश्न यांच्यामुळे त्या घटनेचा आजतागाईतपणा आपल्या सारखा लक्षात येतो; तिसरे म्हणजे त्या काळात राजकारणात वावरणारी गांधी, जिना, जवाहरलाल नेहरु, वल्लभभाई पटेल यांच्यासारखी माणसे, पटावरून नाहीशी झाल्याला दशके लोटल्यानंतरही, आपल्या भवितव्यावर कब्जा ठेवून आहेत, असे मानण्यात आपल्याला काही तरी गूढ समाधान वाटते.

२३ मार्च १९४० या दिवशी लाहोर येथे भरलेल्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनात पाकिस्तान नावाचे स्वतंत्र राष्ट्र हिंदुस्थानातील मुस्लिम-बहुल प्रदेश एकत्र करून निर्माण करावे, असा ठराव झाला. ३० जानेवारी १९४८ रोजी गांधींचा खून झाला. या आठ वर्षांतील घडामोडींकडे पाहिले की, 'कालस्य तु महाशस्त्रं विपरीतार्थदर्शनम्' या महाभारतातील वचनाची आठवण येते. भवतालाकडे स्वच्छ दृष्टीने पाहाण्याची क्षमताच कर्त्या पुरुषांकडे उरलेली नव्हती, अशी समजूत होते. हिंदू व मुस्लिम समाजात परस्परांविषयी पराकोटीचा अविश्वास, असूया व वैरभाव यांनी थैमान घातले होते. कोणाही व्यक्तीला धर्मभेदातीत राहताच येणार नाही अशी भ्रान्त अवस्था निर्माण झाली होती.[१] अशा या काळोखून आलेल्या दशकात नोआखली व टिपेरा या, आता बांगला देशात असलेल्या, जिल्ह्यात जे काही घडले ते विदारक होते. तिथे १८ टक्के हिंदू व ८२ टक्के मुसलमान लोकसंख्या होती. हे दोन्ही समाज शेकडो वर्षे परस्परांशी समंजसपणे राहात आले होते. पण १९४६ च्या ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यात मुस्लिम समाजाने हिंदूंना त्या ठिकाणी हिंदू म्हणून राहूच द्यायचे नाही असा संकल्प करून दंगली घडवून आणल्या.

### (१)

१० ऑक्टोबर १९४६ रोजी नोआखली जिल्ह्याच्या उत्तर भागातील रामगंज पोलीस ठाण्याच्या क्षेत्रातील बाजारावर जमावाने हल्ला केला. गुलाम सर्वर हुसेन नावाच्या मनुष्याने जहरी भाषण करून जमावाला भडकविले होते. गुलाम सर्वरने लोकांना सांगितले होते की, 'ऑगस्टमध्ये कलकत्त्यात झालेल्या दंगलीत मुसलमानांची कत्तल झाली होती तिचा सूड घेतला पाहिजे. त्यासाठी बाबू सुरेंद्रनाथ बोस व रायसाहेब राजेंद्रलाल रायचौधरी यांच्या घरांवर हल्ले करून ती धुळीस मिळविली पाहिजेत.' राजेंद्रलाल रायचौधरी हे नोआखली जिल्ह्यातील आघाडीचे वकील होते आणि हिंदुमहासभेचे पुढारी होते. त्यांच्या घरावरील हल्ल्याचे ह्या हल्ल्याचा बळी झालेल्या साक्षीदाराने केलेले वर्णन प्रत्ययकारी

आहे.

'१० ऑक्टोबर १९४६ या दिवशी सकाळी आठ वाजता हजारोत मोजावा लागेल असा मुसलमानांचा जमाव दोन-दोनशेच्या टोळ्या करून व हातात घातक शस्त्रे घेऊन आमच्या घरावरून पुढे चालून गेला. ह्या टोळ्या 'मुस्लिम लीग झिंदाबाद', 'पाकिस्तान झिंदाबाद', 'लढके लेंगे पाकिस्तान', 'हिंदूंचे रक्त हवे', 'कलकत्त्याचा सूड घ्या' अशा आरोळ्या ठोकत होत्या. त्यांचा रोख माजी आमदार (रायचौधरी) यांच्या हवेलीकडे होता. बारा वाजता आणखी एक जमाव आमच्या घरावरून गेला. 'रायसाहेबांचे डोचके मारा', 'संन्याश्याचे मुंडके उडवा' अशा तऱ्हेच्या गर्जना हा जमाव करीत होता. आमच्या घरातील मनोरंजन बोस नावाच्या मनुष्याला या जमावाने (आमच्या घरातून ओढून) फरपटत नेले. पण (रायसाहेबांच्या घराशी गेल्यावर) रायसाहेबांनी त्याला सोडवून (आपल्या घरात घेतले.) आम्ही आमच्या कुटुंबातील शैलेश रॉय याला रामगंज पोलीस ठाण्यावर तक्रार नोंदविण्यासाठी लगोलग पाठवले. पण तो कधी परतच आला नाही. त्याच दिवशी संध्याकाळी जमावाने शहापूर बाजारावर धाड टाकली, माल लुटला व बाजाराला आग लावली.

'११ ऑक्टोबर १९४६ च्या सकाळी १० वाजता सुमारे ७०० मुसलमानांच्या जमावाने काटपाड्याच्या दक्षिण भागातील सर्व घरे जाळून टाकली आणि आमच्या घरावर घातक शस्त्रांनिशी हल्ला चढविला. हे लोक मुस्लिम लीगच्या जयजयकाराच्या घोषणा देत होते. यावेळी जी झटापट झाली तीत आमच्या परिवारातील व्रजनाथ दास हा मनुष्य जखमी झाला व नंतर मेलाही. नकरीबाडी या गावच्या मन्नु मिया नावाच्या माणसाने भिरकावलेल्या दगडामुळे त्याला (दासला) जखम झाली. त्यानंतर जमावाने आमचे घर सोडले व तो गुलाम सर्वरच्या घराकडे गेला.

'तासाभराने आठ ते दहा हजार मुसलमानांचा जथ्था गुलाम सर्वरच्या पुढाकाराखाली आमच्या घराच्या दिशेने आला. हे लोक 'सर्वर झिंदाबाद! 'हिंदूर् रक्त चाई', राय साहेबरे माथा चाई! 'सन्यासीर् माथा चाई' अशा घोषणा देत होते. तो अफाट जथा पाहून आम्ही भेदरूनच गेलो. रायसाहेबांची हवेली पक्की बांधलेली होती व आमची घरे कुडाची (बांबूच्या तट्ट्यांची) होती. त्यामुळे आम्ही आमची घरे सोडून रायसाहेबांच्या हवेलीचा आश्रय घेतला. आम्ही म्हातारी माणसे (माझे वय ६८ वर्षांचे होते.), बायका व मुले हवेलीच्या छपरावर पोचलो. तिथून दगडफेक करून जमावाला पांगवण्याचा आमचा इरादा होता. तरण्या जवानांनी हवेलीच्या दाराशी उभे राहून मिळेल त्या हत्याराने जमावाला रोखून धरावे असे ठरले ... आमच्या वस्तीपाशी पोचल्यावर सर्वरने बंदुकीचा बार काढून लोकांना हल्ला करण्याचा इशारा दिला. जमावाने आमची (बांबूच्या तट्ट्यांची) घरे पेटवून दिली व त्या आधी घरातला सर्व वस्तुभाव लुटून नेला. (त्यानंतर ते हवेलीवर पोचले.) चार वाजता आमचा प्रतिकार संपुष्टात आला. जमावाकडे पेट्रोल व रॉकेल यांचा भरपूर साठा होता. त्यांनी हवेलीवर पेट्रोल व रॉकेल ओतले. मग जमावातील काही लोक आम्हाला खाली येण्याचा आग्रह करू लागले. 'बडे मिया व छोटे मिया (म्हणजे गुलाम सर्वर व त्याचा धाकटा भाऊ) यांच्याशी बोला. त्यांनी आता कोणालाही मारायचे नाही, असे ठरविले आहे'; असे ते सांगत होते. 'तुम्ही सुरक्षित राहाल', अशी ग्वाही ते लोक कुराणाची शपथ घेऊन देत होते.

'आता सर्वरने गुंडांना सांगितले की, 'शिड्या लावून वर जा व सगळ्यांना खाली आणा'. मोठ्या घोळक्याने गुंड वर आले. त्यांनी स्त्रियांना जबरदस्तीने खाली नेले. खाली पोचल्यावर त्यांना मारहाण करून त्यांच्या जवळचे पैसे व दागिने काढून घेतले. (आमच्यातले) पुरुष सैरावैरा पळत होते. त्यांना धरून आणले. त्यांचे हात बांधले व त्यांना मारून टाकले. राजेन् बाबू व संन्यासी यांची मुंडकी आणणाऱ्याना सर्वरने बक्षीस लावले होते. राजेन् बाबूंना (वरच्या मजल्यावरून) खाली आणल्यावर त्यांचे डोके उडविण्यात आले. त्या वेळी जमावाने आनंदाच्या आरोळ्या ठोकल्या.'[२]

ही झाली दंगल. अशा दंगली त्या काळच्या (व आजच्याही) हिंदुस्थानाला अपरिचित नव्हत्या व नाहीत. मुंबईत तर त्या आठ-दहा वर्षात (१९४०-४८) दर वर्षी हिंदु-मुसलमानांचे दंगे होत. शे-दोनशे माणसे








मारली जात. नोआखलीतल्या दंग्यात मारल्या गेलेल्या माणसांची संख्या ३०० च्या आत-बाहेरच होती व हे सर्व हिंदू होते. कलकत्त्यात १६ ऑगस्टला झालेल्या दंग्यात ५००० माणसांची हत्या झाली होती. नंतर बिहारात दंगली झाल्या त्यात सात हजार मुसलमान मारले गेले होते. तेव्हा दंगल होणे, माणसे मारली जाणे, लूटमार होणे, असे उद्रेक त्याकाळी होत होते. पण नोआखलीत याहूनही गंभीर प्रकार झाला. तो म्हणजे हिंदूंना जबरदस्तीने बाटवून मुसलमान करणे व हिंदू स्त्रियांचे अपहरण करून त्यांच्याशी जबरदस्तीने 'निका' लावणे, हा होय. या सर्वांचा उद्देश एकच होता. तो म्हणजे नोआखली (व टिपेरा) या जिल्ह्यातून हिंदूंना पूर्णपणे घालवून देणे व तो प्रदेश 'पाक' करून टाकणे.

पाचगाव येथील जमीनदार लक्ष्मी मुझुमदार यांनी जबरदस्तीने झालेल्या धर्मांतराच्या प्रसंगाचे वर्णन केले आहे. '१२ (ऑक्टोबर १९४६) तारखेच्या सकाळी मी काही मुसलमान गृहस्थांना मदतीसाठी व सल्ला विचारण्यासाठी बोलावून घेतले .... आम्ही जर मुसलमान झालो तर आमचे वित्त व जीवित यांचे रक्षण होईल, अशी खात्री त्यांनी दिली. आम्ही आमची शस्त्रे त्यांच्या ताब्यात दिली व त्यांच्या सल्ल्याप्रमाणे वागायचे ठरविले. एका ओळखीच्या मुसलमानाने सांगितले की, "तुम्हाला मालमत्ता व प्राण वाचवायचे आहेत ना, मग ताबडतोब मशिदीत जाऊन मुसलमान व्हा." सुटकाच नसल्यामुळे आम्ही मशिदीत गेलो. तिथे बरेच मुसलमान हातात हत्यारे घेऊन उभे होते. ...' अशाच जबरदस्तीला बळी पडलेल्या दुसऱ्या माणसाने लिहिले आहे, 'त्या रात्री पाच-सात माणसांच्या टोळ्या करून मुसलमान लोक आमच्या घरी आले व आम्हाला सांगू लागले की, "मुसलमान व्हा". आम्ही त्यांना भेटलोच नाही. पण १२ ऑक्टोबर (१९४६) च्या सकाळी दोनशे मुसलमानांचा जथा आमच्या घरावर चाल करून आला व त्यांनी आम्हाला धमकी दिली की, "मुसलमान व्हा, नाही तर मारले जाल!" आम्ही मान तुकविली. मग शहापूर हायस्कूलातील मौलवी साहेबांनी मला व माझ्या कुटुंबातील इतरांना बाटवले. त्या वेळी गोळा झालेल्या लोकातील मौलवी बडू मियां व महमुद मियां पतरी यांनी आम्हाला धमकावून आमच्या घरातील देवदेवतांच्या मूर्ती व चित्रे फोडायला लावली. १३ ऑक्टोबरला माझ्या घरासमोर (मुसलमान) लोकांनी मशीद बांधली आणि माझ्याकडून (मुस्लिम) लीगसाठी एक हजार रुपयांची देणगी घेतली.'[३]

या धामधुमीच्या काळात टिप्पेरा जिल्ह्यातील गुप्ती, बाचताळी, गोविंदपूर या तीन खेड्यातील सर्व हिंदूंना जबरदस्तीने बाटविण्यात आले. त्याखेरीज तीन पोलीस ठाण्यांच्या अखत्यारीत असणाऱ्या प्रदेशातून सुमारे २२,२५० हिंदूंचे सक्तीने धर्मांतर करण्यात आले, असे सिंम्पसन या ब्रिटिश अधिकाऱ्याने नमूद करून ठेवले होते. तरी बंगालच्या मुस्लिम लीग सरकारचा त्या वेळचा पंतप्रधान (तेव्हा प्रांताच्या 'मुख्यमंत्र्या'ला पंतप्रधान म्हणत असत) विधानसभेत ठामपणे सांगत होता की, टिपेरा जिल्ह्यात ९,८९५ हिंदूंनी आपखुशीने इस्लामचा स्वीकार केला.[४]

हिंदूंना जबरदस्तीने बाटवून मुसलमान करण्यात आले, ही गोष्ट दोन्ही पक्षांना कलंक ठरणारी होती व याची तीव्र वेदना गांधींना वाटली. पुढे गांधी नोआखलीत गेले असता त्यांना खलिलुर रेहमान नावाचा धर्मगुरु भेटला. या धर्मगुरुने दंगलीच्या काळात अनेक हिंदूना बाटवून मुसलमान केले होते. गांधीनी त्याला याविषयी खोदून विचारले असता त्याने उत्तर दिले की, "ह्या धर्मांतरांकडे फारशा गांभीर्याने पाहू नका. हिंदूंचे जीव वाचविण्यासाठी तो एक बनाव रचला होता!" गांधी म्हणाले की, "प्राण वाचविण्यासाठी आपला धर्म सोडणे, ही निंद्य गोष्ट आहे. तुम्ही धर्मगुरु आहात. तुम्ही हिंदूना उपदेश करायला हवा होता की, प्राण गेला तरी बेहत्तर, पण धर्म राखला पाहिजे. भिऊन धर्मत्याग करणे, हे (लांच्छनास्पद आहे)." त्यावर धर्मगुरु म्हणाला की, "जीव वाचवण्यासाठी असे खोटे धर्मांतर करणे याला (आमच्या) धर्मात परवानगी आहे." आता गांधी संतापले व म्हणाले की, "जर कधी देवाची भेट झाली, तर मी त्याला विचारेन की, असली (पाखंडी) मते मांडणारा मनुष्य धर्मगुरु झालाच कसा?" यावर खलिलुर रहमान गप्प बसला व थोड्या वेळाने निघून गेला.[५]

अनुक्रमणिका

हिंदू स्त्रियांवर झालेले बलात्कार, त्यांची अपहरणे व मुसलमान पुरुषांशी त्यांची सक्तीने लावलेली लग्ने हा नोआखलीतील हिंदूंवर चाललेल्या अत्याचारांचा तिसरा व सर्वात हृदयद्रावक भाग होता. कोणत्याही समाजातील स्त्री हा त्या समाजाचा मानबिंदू समजला जातो. स्त्री ही त्या समाजाच्या परंपरेचा प्रतिपाळ करते. अशा स्त्रीचे अपहरण व तिचा जबरदस्तीने 'निका' लावणे या मागील उद्दिष्ट हेच होते की, नोआखली व टिपेरा या जिल्ह्यातून हिंदूंचे अस्तित्व संपवून टाकणे. त्या वेळी बंगालमध्ये मुस्लिम लीगचे मंत्रिमंडळ होते. या मंत्रिमंडळाकडे बंगालमधील सर्व धर्मांच्या नागरिकांच्या रक्षणाची जबाबदारी होती. त्यामुळे स्त्रियांवरील अत्याचार व जबरदस्ती यांच्या घटनांना प्रसिद्धी मिळू न देण्याची दक्षता सरकार घेत होते. मुख्यमंत्री सुऱ्हावर्दी यांनी विधानसभेत सांगितले की, 'नोआखलीत स्त्रियांच्या अपहरणाच्या फक्त दोन घटना घडल्या; तर टिपेरा जिल्ह्यात पाच घटना घडल्या.' सिंम्पसन या अधिकाऱ्याचा अहवाल मात्र असा होता की, टिपेरा जिल्ह्यातील फक्त तीन पोलिस ठाण्यांच्या अखत्यारीतल्या प्रदेशातच बलात्काराच्या ७१६ आणि स्त्रियांना पळवून व डांबून ठेवण्याच्या १५७ घटना घडल्या होत्या.[६]

यात विशेष असा होता की, नोआखली-टिपेरा भागातला बहुतेक मुस्लिम समाज या सर्व अत्याचारात प्रत्यक्ष किंवा परोक्ष रीतीने सामिल झाला होता. जाळपोळ व लुटालूट करणे, खून पाडणे, स्त्रियांवर जबरदस्ती करणे या दुष्ट कृत्यात भाग घेणारे लोक कमी असले तरी बाकीच्या मुसलमानांना अशा अत्याचारांची चीड वाटत नव्हती; बहुतेकांना जे चालले ते ठीकच चालले आहे, असे वाटत होते. जेव्हा हिंदू स्त्रीचा मुसलमानाशी जबरदस्तीने 'निका' होई तेव्हा त्या प्रसंगी हजर असणाऱ्याना वाटे की, भावी हिंदूंना बाटविण्याचा हा सगळ्यात सोपा उपाय आहे. त्या भागात असणाऱ्या सर्व ब्रिटिश अधिकाऱ्यांचे हेच मत होते की मुसलमानांपैकी फार मोठ्या भागाला हिंदूंवरील चाललेल्या अत्याचारांबद्दल समाधानच वाटत होते.

(२)

वर सांगितलेला उद्रेक ऑक्टोबर १९४६ मध्ये झाला. त्यानंतर गांधींनी ६ नोव्हेंबर १९४६ पासून २ मार्च १९४७ पर्यंत, म्हणजे चार महिने, नोआखलीत मुक्काम केला. त्याचे वर्णन आपण पुढे करणारच आहोत. मध्यंतरी २५ ऑक्टोबर १९४६ पासून नोव्हेंबर १९४६ अखेरपर्यंत, नोआखलीतील दंगलीची प्रतिक्रिया म्हणून बिहारमध्ये मुसलमानांच्या विरोधात दंगली झाल्या. इतके सगळे झाल्यानंतर देखील मे १९४७ मध्ये नोआखलीतील हिंदूंची कशी होरपळ झाली होती याचे चित्र चितगाँग विभागाचे आयुक्त (डिव्हिजनल कमिशनर) यांच्या कचेरीकडून बंगाल सरकारकडे पाठविलेल्या अहवालात सापडते.

अहवाल सांगतो की, 'सध्या वर वर पाहता जिल्ह्यातील परिस्थिती "असावी तशी" वाटते. शेतात तांदूळ व ज्यूट यांची पिके तरारली आहेत. बाजार व दुकाने उघडी असून नेहमीप्रमाणे व्यवहार चालले आहेत. हिंदू व मुसलमान सामान्य स्थिती असताना कोणताही ताणतणाव मनात न बाळगता वावरत असत तसेच हिंडता फिरताना दिसतात. तथापि, जरा खोलात डोकावून पाहिले तर ध्यानात येते की, वातावरण तणावपूर्ण आहे आणि हिंदू भीतीच्या सावटाखाली जगत आहेत. बऱ्या लोकसंख्येच्या गावापासून दूर असणाऱ्या ग्रामीण भागात गेले की, हिंदूंना कोणत्या छळाला व अवहेलनेला तोंड द्यावे लागत आहे, हे समजून येते.

'ऑक्टोबर १९४६ मध्ये झालेल्या दंगलींची झळ 'भद्रलोक' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या समाजाला पोचली. त्या आघातातून ते लोक अजून सावरलेले नाहीत. आपली वतनवाडी सोडून इथून पळ काढण्यालाही या अभिजनवर्गाची तयारी होती. पण आपला गाव सोडणे म्हणजे आपल्या सर्वस्वावर पाणी सोडणे होय असे त्यांना वाटत असल्याने, ते अनेक अपेष्टा व अत्याचार सोसत इथेच राहिले आहेत. मुसलमानांची या लोकांना एवढी दहशत बसली आहे की, आपल्यावर झालेला जुलूम व आपली चाललेली छळणूक याविरुद्ध पोलिसात तक्रार करण्याची हिंमतही त्यांना होत नाही. स्थानिक राजकीय कार्यकर्त्यांकडे ते लोक क्वचित कधीतरी आपली व्यथा अधिक दारुण रूपात बोलून दाखवितात. पण जर त्यावर विसंबून पोलीस चौकशी करू लागले तर

अनुक्रमणिका

मात्र कोणीही त्या हकीकतीची खात्री पटवायला पुढे येत नाही. त्यामुळे हिंदू लोकांची विश्वासार्हता ऱ्हास पावत चालली आहे.'

चोरी, घरफोडी, जळिते अशा गुन्ह्यात काही मुसलमानांची घरेही बळी जातात. पण ९ हिंदू घरामागे एक मुसलमान घर असे त्यांचे गुणोत्तर असते. हे खरे आहे की, हिंदू मुसमानांपेक्षा जास्त सधन असल्याने हिंदूंची घरे लुटणे चोरांना जास्त फायद्याचे वाटत असेल; पण हिंदूंवर होणारे हे अत्याचार धर्मद्वेषातून होत आहेत हे तितकेच खरे आहे.

'मुसलमानातील एक गट हिंदूंच्या भयग्रस्त स्थितीचा फायदा घेत त्यांचे अपमान करून, त्यांना धमक्या देऊन त्यांना पूर्णपणे दीन करून टाकण्याच्या मागे आहे. एकदा हिंदूंना नेस्तनाबूत केले की, त्यांच्या वतनवाड्या बळकावून त्यांना गुलाम करून टाकायला हे मोकळे. हिंदूंना 'काफीर' म्हणून हटकणे हे नित्याचेच झाले आहे. हिंदू माणसाला गाठून त्याचा पैसा-अडका किंवा जी कोणती हवीशी वाटेल ती वस्तू हिसकावून घ्यायची हे कधी कधी घडते. हिंदू माणसाने बाजारात खरेदी करून घरी यायला लागावे व वाटेत त्याने खरेदी केलेल्या वस्तू जबरदस्तीने काढून घेतल्या जाव्यात असा अनुभवही येतो. हिंदूंच्या परसातील नारळी-सुपारीच्या झाडांवर चढून ती फळे काढून नेणे; त्यांच्या घराचे पत्रे व तुळ्या घरातल्या लोकांकडून धमकावणीने परवानगी घेऊन उचलून नेणे; हिंदूंच्या घरातील पाळीव जनावरे-गायी, बैल-दोर तोडून पळून जाणे; हिंदूंच्या शेतातील तांदूळाची रोपे उपटून फेकली जाणे इ. गोष्टी नित्याच्याच झाल्या आहेत. जर कोणा हिंदूने याबद्दल पोलिसात तक्रार केली तर त्याचे घर जळून जाते.

'हिंदूंची चित्रपटगृहे बंद पडावीत, हिंदू कोष्ट्यांचा हातमागावरील विणकामाचा धंदा बसावा, बाजारातील त्यांची दुकाने बंद व्हावीत या उद्देशाने धमकावण्या व राजकीय हालचाली यांना ऊत आला आहे. (ऑक्टोबरच्या दंगलीत जळालेली) आपली घरे काही हिंदूंनी पुनः बांधली आहेत. पण त्यांनी आपल्या घरात राहायला येऊ नये व हा भाग सोडून चालते व्हावे अशा धमक्या त्यांना मिळत आहेत. (ऑक्टोबरच्या दंगलीतील) आरोपींविरुद्धच्या तक्रारी हिंदूंनी मागे घ्याव्यात किंवा साक्षी फिरवाव्यात यासाठीही तक्रार करणाऱ्यावर जबरदस्ती होते आहे.'[७]

नोआखली-टिप्पेरा हे जिल्हे ऑक्टोबर १९४६ पर्यंत धार्मिक तणावांपासून मुक्त असलेले जिल्हे होते. ह्या जिल्ह्यातील शेतमजुरांची व कुळांची एक वर्ग म्हणून संघटना करण्याचे व त्यांच्या आर्थिक मागण्या जमिनदारांकडून उगवून घेण्याचे प्रयत्न या जिल्ह्यात केवळ आर्थिक अंगाने झाले होते. धार्मिक दंगलीत ज्याने पुढाकार घेतला तो, वर उल्लेखिलेला, गुलाम सर्वर हा अशी संघटना बांधणाऱ्यापैकी एक होता. तो आमदार म्हणून निवडून आला होता तेव्हा अर्थातच मुसलमानांसाठी राखीव असणाऱ्या मतदार संघातून निवडला गेला होता. मुस्लिम लीग या पक्षाचा तो कट्टर विरोधक होता आणि ४५ सालच्या निवडणुकीत तो 'मुस्लिम पार्लमेंटरी बोर्ड' या संघटनेच्या बाजूने मुस्लिम लीगच्या विरोधात उभा होता. त्या निवडणुकीत मुस्लिम लीगच्या फझ्लूल करीम या उमेदवारापेक्षा सुमारे २०,००० मते कमी पडल्याने सर्वर पराभूत झाला.

सर्वरची आणि नोआखलीची ही पृष्ठभूमी लक्षात घेऊन पार्थ चटर्जी या डाव्या विचारसरणीच्या इतिहासकाराने व इतरही अनेक विचारवंतांनी असे मत मांडले आहे की, नोआखलीतील दंगलीकडे केवळ धार्मिक दंगल म्हणून पाहाणे वस्तुस्थितीला धरून होणार नाही. १९४६ पूर्वीची चार-पाच वर्षे नोआखलीला फार बिकट परिस्थितीला तोंड द्यावे लागले होते. बंगालमध्ये भीषण दुष्काळ पडला, जपानी आक्रमणाच्या भीतीमुळे इंग्रज सरकारने नोआखली भागातील प्रजेला हलवून सुरक्षित जागी सक्तीने हलविले, याच सुमारास ४२ ची चळवळ होऊन काँग्रेस या निखालस राष्ट्रीय पक्षावर बंदी आली आणि मुस्लिम लीग व हिंदुमहासभा या धर्माधारित पक्षांना आपला प्रभाव वाढविता आला. या सगळ्याचा परिणाम असा झाला की, मुळातील आर्थिक लढ्याला धर्मद्वेषाचा रंग चढला.

पार्थ चतर्जी, सुगत बोस इत्यादी अभ्यासकांच्या या प्रतिपादनात तथ्य असले, तरी नोआखलीतील दंगली व अत्याचार यांत जो विखार दिसून येतो तो धर्मद्वेषातून

अनुक्रमणिका

निर्माण झाला होता यात शंका नाही. नोआखलीतील सर्वच जमीनदार काही हिंदू नव्हते. मुसलमान जमीनदार होते व तेही कुळांकडून खंड वसूल करीत होते. मग त्यांना काहीच झळ का पोचली नाही? त्यावर पार्थ चतर्जी यांचे उत्तर फारच चलाखीचे आहे. ते म्हणतात की, 'खंड उकळणाऱ्या मुस्लिम जमीनदारांना कुळे ते आपल्यापैकीच आहेत असे समजत होती. उलट, हिंदू जमीनदार व त्याचे खंड वसूल करणारे हस्तक हे कूळ म्हणून राबणाऱ्या शेतकऱ्यांना ,आपल्यातले वाटत नव्हते.'[८] पण हा फरक पडण्याचा खुलासा केवळ धर्म-भेदाच्या संदर्भातूनच होऊ शकतो.

दुसरे असे की, दंगलीचे बीज जर आर्थिक विषमता हेच असेल, तर हिंदूंना जबरदस्तीने बाटविण्यामागे काय उद्दिष्ट होते? हिंदू जमीनदारांबरोबरच कोष्टी, दलित, दुकानदार, व्यापारी या हिंदू लोकांवरही अत्याचार का झाले? आर्थिक विषमता व शोषण हे मुद्दे कितीही ताणले तरी त्यामुळे नोआखलीतील दंगलीत संपूर्ण हिंदू समाजाला लक्ष्य करण्यात आले, त्या समाजाने नोआखली-टिप्पेरा हा प्रदेश सोडून जावे अशी परिस्थिती निर्माण करण्यात आली, हिंदुस्थानची फाळणी होईल तेव्हा हा भाग पाकिस्तानात जाण्यास लायक राहील अशी दक्षता घेण्याचा हेतू या दंगलीमागे होता, ह्या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष्य करावे इतक्या टप्प्यावर तर्क पोचणार नाही. १९४२ पासून पुढे पूर्व बंगालमधील मुस्लिम समाजात मुस्लिम लीगचे द्विराष्ट्र वादाचे स्वप्न लोकांच्या मनात पक्के रुजले. लीगला विरोध करणारी कृषिक प्रजा पार्टी लुप्त झाली व तिचा नेता फझ्लूल हक्क स्वतः मुस्लिम लीगला मिळाला. त्याच्या पाठोपाठ गुलाम सर्वरही आपल्या धर्मातीत व अर्थकारणपर पूर्वावतारावर पडदा पाडून लीगमध्ये गेला होता. असो.

(३)

मागे सांगितल्याप्रमाणे हिंदुस्थानाला भिन्न धर्मीय समाजातील दंगल व वैरभाव या गोष्टी नव्या नव्हत्या. धर्मभेदावर आधारित दंगलींची सुरूवात पार्शी व मुसलमान यांच्यातील दंग्यापासून झाली. नंतर दर काही वर्षांनी दंगे होतच गेले. एकोणीसशे वीस सालानंतर तर हिंदू-मुसलमानातील दंग्यांना ऊत आला होता. चाळीस साली पाकिस्तानचा ठराव मुस्लिम लीगने केल्यानंतर दंगली जास्त त्वेषाने होऊ लागल्या. परंतु नोआखलीतील दंगलींचा विखार काही वेगळाच होता. ती एका अर्थाने वंश-हत्याच (जिनोसाईड) होती. वंशहत्या काही माणसे मारूनच घडून येते असे नाही. एका जमातीला एका विशिष्ट भूभागात जगणे अशक्य करून सोडणे ही देखील वंशहत्याच होय. नोआखलीतील मुसलमानांचा या अर्थाने 'वंशहत्या' करण्याचा उद्देश स्पष्ट झाला होता. धर्मावर आधारलेले राजकारण करणारे पक्ष हिंदी जनतेला नवे नव्हते. धर्माच्या नावावर दंगली व हत्याही झाल्या होत्या. पण आमच्या अत्याचारांना धर्माची मान्यता आहे, हा दावा विशेष होता.

पाकिस्तान व हिंदुस्थान अशी फाळणी झाली तरी पाकिस्तान हे केवळ मुसलमानांचे राष्ट्र असेल व हिंदुस्थान हे फक्त हिंदूंचे राष्ट्र राहील अशी मांडणी आजवर मुस्लिम लीगनेही केली नव्हती. फाळणी झाल्यानंतरही लोक आपापल्या ठिकाणीच राहून आपले आयुष्य घालवतील अशी समजूत होती. हा वेळपर्यंत गांधीही 'पाकिस्तान होणे शक्य आहे' इतक्या तयारीवर आले होते. मुळातच लीगने पाकिस्तानचा ठराव केल्यानंतर गांधींनी 'हरिजन' मध्ये लिहिले होते की, 'मुसलमानांना पाकिस्तान हवे असेल तर त्याला अहिंसक मार्गाने कसे तोंड द्यावयाचे ते मला समजत नाही.' पुढे ४४ साली गांधींनी जिनांशी वाटाघाटी करताना राजगोपालाचार्य यांच्या प्रस्तावाला मान्यता दर्शविली होती. प्रस्तावाचा रोख हाच होता की, लीग व काँग्रेस यांनी संयुक्तपणे इंग्रजांशी लढा द्यावा व इंग्रज गेल्यावर फाळणी करावी. जिनांनी हा प्रस्ताव फेटाळून लावला होता. सारांश, गांधींना द्विराष्ट्रवाद, धर्माधिष्ठित राजकारण व फाळणी या गोष्टी तत्त्वतः अमान्य असल्या तरी याच गोष्टींच्या अनुरोधाने चाललेल्या मुस्लिम लीगच्या कारवायांना अहिंसक मार्गाने अटकाव कसा करावा हेही उमगत नव्हते. नोआखलीतील दंगलींनी गांधींसमोर एक नवे आव्हान उभे केले होते. त्यामुळे दंगलींची माहिती कळताच एका महिन्यातच ते नोआखली - टिपेरा या प्रदेशात येऊन दाखल झाले.

नोआखलीतील आपल्या कामाकडे ते एक लढाई

अनुक्रमणिका






म्हणूनच पाहात होते. त्यामुळे दंगलीत गेलेल्या बळींची संख्या, मालमत्तेच्या विनाशाची मोजदाद या गोष्टी त्यांच्या लेखी दुय्यम स्वरूपाच्या होत्या. लढाई म्हटली की, असे अत्याचार होतातच. पण स्त्रियांवरील जबरदस्ती, मोठ्या प्रमाणावर झालेली बाटवा बाटवी आणि आपण केलेल्या अत्याचारांना धर्माचे अधिष्ठान आहे ही दंगेखोरांची धारणा त्यामुळे गांधी व्यथित झाले होते.[९] या सर्व परिस्थितीला तोंड कसे द्यावयाचे याची काहीच योजना गांधींपाशी होती, असे दिसत नाही. तोडगा शोधण्यासाठी ते चाचपडत होते, असाच आपला समज होतो. निर्मल-कुमार बोस यांनी लिहिले आहे की अनेकदा गांधी स्वतःशीच हताश होऊन 'क्या करू? क्या करू?' असे पुटपुटत असत.

मागे सांगितल्याप्रमाणे गांधी ६ नोव्हेंबर १९४६ रोजी नोआखली जिल्ह्यात पोचले. सुरूवातीला त्यांनी गोपिरबाग तालुक्यातील गावाना भेटी दिल्या. वीस नोव्हेंबरला ते श्रीरामपूर या गावी पोचले व तिथेच दीड महिना राहिले. या काळात त्यांनी आपल्या परिवारातील स्वयंसेवकांना निरनिराळ्या खेड्यात जाऊन राहाण्यास सांगितले. नंतर २ जानेवारी ४७ पासून त्यांनी नोआखली-टिपेरा जिल्ह्याच्या अंतर्भागातील खेड्यांना भेटी देण्यास सुरूवात केली. हा दौरा दोन मार्च पर्यंत चालला. यानंतर गांधींवर बिहार मध्ये चाललेल्या धार्मिक दंगलींमुळे बिहारचा दौरा करण्यासाठी मुस्लिम लीग व मुस्लिम नागरिक यांच्या कडून दडपण येऊ लागले व त्यांनी नोआखलीतील काम सोडून बिहारची वाट धरली. पुनः नोआखलीत येण्याचा त्यांचा निश्चय होता. पण मौंटबॅटन हिंदुस्थानचा व्हॉईसरॉय म्हणून आल्यावर घटनाचक्राला इतकी गती मिळाली की, नोआखलीत परत येणे गांधींना जमले नाही.

## (४)

गांधी नोआखलीतील खेड्यातून फिरत असताना गांधी व त्यांचा परिवार यांच्या संरक्षणासाठी वीस सशस्त्र पोलीस मुक्रर केलेले होते.[१०] खुद्द गांधींना हे संरक्षण अजिबात नको होते. लोकांना 'निर्भयतेचा संदेश' देत आपण पोलिसी संरक्षणाखाली फिरायचे ही गोष्ट त्यांना लज्जास्पद वाटत होती. या पोलिसांच्या हजेरीमुळे लोक आपल्यापाशी यायला घाबरतात आणि लोकांशी आपला जवळून संवाद होऊ शकत नाही, अशी त्यांची तक्रार होती. तथापि, बंगालमधील मुस्लिम लीगचे सरकार किंवा दिल्लीतील ब्रिटिश सरकार गांधींच्या संरक्षणाची जोखीम टाळू शकत नव्हते.

गांधींच्या नोआखलीतील कार्याचे तीन पैलू होते. पहिला पैलू असा की, हिंदूंना बसलेली धास्ती नाहीशी करणे. आपल्या प्रार्थनासभातून आणि लोकांशी झालेल्या संभाषणातून गांधी हिंदूंना सतत हेच सांगत की, भीती सोडा व निर्भय होऊन राहा. तथापि, नोआखली भागावर भयाकूलतेचे सावट गडद पसरलेले होते. काल परवापर्यंत ज्यांच्या सहवासात हिंदू मोकळेपणाने वावरले तेच आज मारेकरी होऊन खून पाडत होते. हिंदु-मुसलमान व्याव-हारिक संबंध तर सोडाच पण साधे संभाषण होणेही मुश्किल झाले होते. अशा स्थितीत हिंदूंच्या संरक्षणाची कोणतीच व्यवस्था न करता त्यांना निर्भयतेचा संदेश देणे, हे अप्रस्तुत होते, असे हिंदुमहासभेला वाटत होते. नोआखलीतील हिंदूंना लष्करी संरक्षण द्यावे अशी हिंदु-महासभेची मागणी होती. गांधी स्वतःला 'प्रॅक्टिकल आयडियलिस्ट' म्हणजे व्यवहार्य आदर्शवादाचे उपासक म्हणवीत. हिंदु मुसलमानांनी पुनः पूर्वीप्रमाणे सलोख्याने व मिळून मिसळून राहावे ही त्यांची आदर्शवादी अपेक्षा होती. लष्करी बंदोबस्तात हिंदूंनी राहाणे म्हणजे हिंदुमुसलमानातील दळण-वळण बंदच पाडणे होय. खेरीज, हे लष्करी संरक्षण किती काळ परवडले असते? ते केव्हातरी काढून घ्यावेच लागणार; मग त्यानंतर हिंदूंनी कसे राहायचे? काही लोक अशीही कल्पना मांडत की, नोआखलीतील हिंदूंना दोन तीन ठिकाणी त्यांच्या वस्त्या उभारून व बाजूने बंदोबस्त ठेवून राहायला द्यावे. पण हा उपायही गांधींना पसंत नव्हता. हिंदूंच्या अशा वस्त्या (किंवा छावण्या म्हणा) करणे याकडे मुसलमानांनी कोणत्या दृष्टीने पाहिले असते? त्यांना वाटले असते की, 'हिंदू ही लढाईची तयारी करीत आहेत.' गांधींचा मार्ग वेगळा होता. भीतिग्रस्त चंपारण्यात त्यांनी यापूर्वी काम केले होते. तेथे त्यांनी जी व्यवस्था बसविली होती तशीच कार्यवाही ते नोआखलीत करणार होते. प्रत्येक खेड्यात एका कार्यकर्त्याने राहावे व आपले







अनुक्रमणिका

शुद्ध आचरण, विनम्र स्वभाव आणि उपकारशीलता यांच्या योगाने गावकऱ्यांची मने जिंकून घ्यावीत. हिंदू व मुसलमान यांच्यात परस्पर विश्वासाचे वातावरण तयार करावे. याच उद्देशाने त्यांनी आपल्या परिवारातील सुशीला नायर, मनू गांधी इ. कार्यकर्त्यांना एकेका खेडेगावात राहायला पाठवले.

नोआखलीतील कार्याचा दुसरा पैलू होता तो हिंदुमुसलमानांना म्हणजे मुख्यतः मुसलमानांना हे पटवून देण्याचा की, परस्परांना सांभाळून घेण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे. गांधींची ठाम धारणा होती की, धर्माच्या पांघरुणाखाली व पाकिस्तानच्या कल्पनेचा आधार घेऊन मुसलमान आपल्या बेजबाबदार गैरवर्तनाचे समर्थन करू पाहात होते. मुसलमानात ही जबाबदारीची भावना जर निर्माण झाली व जोपासली गेली तरच हिंदू व मुसलमान परस्परांशी व्यवहार करू लागून एकत्र राहातील. नोआखलीतील भयंकर अत्याचारांनी पोळलेल्या हिंदूत त्यावेळी अशी भावना होती की, आपण नोआखली सोडून (हिंदुबहुल) प्रदेशात उडून जावे. गांधीचे म्हणणे होते की, अशा तऱ्हेचे स्थलांतर होणारच असेल तर ते सर्व हिंदूंचे झाले पाहिजे आणि पद्धतशीर रीतीने झाले पाहिजे. तथापि असे स्थलांतर करणे म्हणजे द्विराष्ट्र–वाद व पाकिस्तान यांना मान्यता देण्यासारखे होईल. मुस्लिम लीगला जे अपेक्षित आहे, तेच घडवून आणल्याप्रमाणे होईल. त्याहून महत्त्वाचे म्हणजे बंगाल सरकार व मुस्लिम जमात यांना त्यांच्या जबाबदारीतून आपण सोडविले, असा त्याचा अर्थ होईल. त्यामुळेच हिंदूंनी धैर्य एकवटून व प्राण पणाला लावून आपल्या जागीच निर्भयपणे राहाण्याची व तशीच वेळ आल्यास मरून जाण्याची तयारी दाखविली पाहिजे.

ही जबाबदारीची जाणीव समाजात निर्माण करण्याचा एक उपाय बंगालच्या लीग सरकारनेच सुचविला होता. तो म्हणजे हिंदू मुसलमानांच्या शांतता–समित्या गावा–गावात स्थापन करावयाच्या. त्या समितीचा मुख्य म्हणून एका सरकारी प्रतिनिधीची नेमणूक करायची. हिंदूंच्या मनात मुसलमानांविषयी व सरकारी नोकरांविषयी इतका तीव्र अविश्वास होता की, ते अशा समित्यांचा विचारही करण्यास तयार नव्हते. पण गांधींनी असा आग्रह धरला की, हिंदूंनी शांतता–समित्यांवर विश्वास दाखविला पाहिजे व ह्या समित्या करीत असलेल्या कामाचा आदर केला पाहिजे. या समित्यांनी लोकात परस्परांविषयी विश्वास निर्माण व्हावा म्हणून प्रचाराची पराकाष्ठा करावी. जे पळून गेलेले हिंदू गावात परततील त्यांच्या अन्न–वस्त्र-निवारा यांची सोय पाहावी. गावातील गुंड व दंगेखोर लोकांची यादी करून त्यांच्या गुन्ह्यांची नोंद पाहावी; व नोंद सापडल्यास पोलिसाकरवी अशा गुंडास अटक करवावी, अशा तऱ्हेची या शांतता समित्यांच्या कार्याची आखणीही गांधींनी केली.

गांधींनी सर्व माणसे किंवा समाजातील फार मोठा समुदाय निर्भय व जबाबदारीची जाण ठेवणारा व्हावा अशी अवास्तव अपेक्षा ठेवली नव्हती. गावात एकटा-एक मनुष्य जरी निर्भय व जबाबदार निघाला तरी खूप झाले, असे ते म्हणत. मुराईम या गावातील एक मौलावी असा सापडला की, ज्याने एकट्याने गावातील मुसल-मानांना अत्याचारापासून परावृत्त केले होते. एका मनुष्यातील उदात्त भावना व कर्तव्याची जाणीव यांची प्रतिकूल असणाऱ्या समुदायावर कशी छाप पाडते याचे हा मौलवी हे उदाहरण होते.

गांधींच्या प्रतिपादनातील तिसरा मुद्दा असे तो नैतिक व उदात्त आचरण यांचे महत्त्व. मुसलमानात जी धार्मिक कट्टरता भिनली होती व तिच्या आधारामुळे, आपण केलेले अत्याचार हे पुण्यकारकच ठरतात असा जो विश्वास त्यांना वाटत होता त्यावर उतारा म्हणून गांधी कोणत्याही कृत्याची योग्यायोग्यता नीतीच्या व माणुसकीच्या निकषांवर तपासावी लागते, याचा आग्रह धरीत. आपण मागे पाहिले आहे की, ज्याने हिंदूंचे सामुदायिक धर्मांतर घडवून आणले होते त्या मौलवी खलिलुर रहमान याला गांधींच्या नैतिक व उदात्त दृष्टिकोणापुढे कशी माघार घ्यावी लागली होती. गांधींचा हा कायमचा आग्रह असे की, नैतिक व उदात्त विचारसरणी हीच इस्लामचा आधार आहे व दंगलीच्या काळात जी अपकृत्ये मुसलमानांनी केली ती इस्लामला लांच्छनास्पद होती. फत्तेपूर इथे ७ जानेवारी १९४७ रोजी बोलताना गांधी म्हणाले होते,








"तुम्ही मुसलमान या भागात मोठ्या संख्येने आहात म्हणून तुम्ही हिंदूंची छळणूक चालविली आहे. पण यात अभिमान बाळगावा असे काय आहे? तुमच्या 'कुराणा'त कुठे तरी अशी वागणूक करावी असा उपदेश केला आहे का? ... म्हणून अतिनम्रतेने माझी तुम्हाला विनवणी आहे की, असले अत्याचार करण्यापासून तुमच्या लोकांना परावृत्त करा. त्यानेच तुमचा येता काळ उज्ज्वल होण्याची शक्यता आहे."

(५)

तथापि, गांधींनी जीव तोडून केलेल्या विनवण्या, उपदेश, प्रवचने यांचा मुस्लिम समाजावर व हिंदूंवरही फारसा परिणाम झाला नाही. बंगालमधील मुस्लिम लीगचे सरकार गांधींना पाण्यात पाहात होते व "नोआखलीतील हिंदूंवर झालेल्या अत्याचारांपेक्षा अधिक घोर अत्याचार बिहारमध्ये मुसलमानांवर होत आहेत पण गांधी तिकडे दुर्लक्ष करतात", असा प्रचार करीत होते.[११] गांधींच्या प्रार्थनासभांवर मुसलमानांनी बहिष्कार टाकला होता.[१२] जानेवारी १९४७ च्या अखेरीपासून मुसलमानांनी हिंदूंवरही बहिष्कार टाकला. त्यामुळे हिंदूंच्या आर्थिक नाड्याच आवळल्या गेल्या. केवळ जमिनदारच नव्हेत तर गरीब शेतकरी, मासेमार व कारागीर यांचाही निर्वाह चालणे अशक्य झाले. निर्मल कुमार बोस, जे या दौऱ्यात गांधींच्या चिटणिसाचे काम पाहात होते व घडामोडींचे प्रत्यक्षदर्शी होते, त्यांचा अभिप्राय असाच आहे की, "गांधीजींच्या उपदेशाचा हिंदूंवर काय परिणाम झाला असेल तो असो; पण सामान्य मुसलमानावर त्याचा काहीच प्रभाव पडला नाही."[१३]

नोआखलीतील आपल्या प्रयत्नांना अपेक्षित प्रतिसाद मिळत नाही यामुळे गांधी व्यथित झाले. आपण व्यक्तिशः पुरेसे शुद्ध व पवित्र नाही, आपण वासनांचा त्याग करू शकलो नाही, आपण स्थितप्रज्ञ झालो नाही त्यामुळे आपल्या कार्यात हिणकसपणा राहिला, असे त्यांना वाटू लागले. आसक्तींमध्ये सर्वात दुर्दम्य आसक्ती ही स्त्रीविषयक आस्कती होय; आणि गांधींना तरुणपणापासून या आसक्तीपासून मुक्त होण्याचा ध्यास लागला होता. १९०६ साली, वयाच्या ३७ व्या वर्षी गांधींनी ब्रह्मचर्याची शपथ घेतली.[१४] तेव्हापासून स्त्रियांशी होणारे आपले वर्तन अधिकाधिक शुद्ध होत गेले व त्याप्रमाणात आपण अहिंसेच्या मार्गावर अधिक प्रगती करत राहिलो, असा गांधींचा विश्वास होता. १९३६ सालच्या फेब्रुवारीत एके दिवशी गांधी झोपले असताना त्यांची वासना जागृत झाली. तेव्हा या आपल्या दोषाची जाहीर कबुली २९ फेब्रुवारी १९३६ च्या 'हरिजन'च्या अंकात गांधींनी दिली होती. यावरून पुरुष-सुलभ वासनेला ते किती त्याज्य मानत होते, ते कळून येते.[१५]

गांधींनी ब्रह्मचर्याच्या मार्गाने आपला प्रवास जस जसा पुढे नेला तसतशी त्यांची स्त्रीविषयीची वासना तर कमी होत गेली; पण स्त्रीकडे आई, बहीण अगर मुलगी म्हणून पाहावयाचे व त्या नात्यांनी मिळणाऱ्या तिच्या सहवासात आनंद मानावयाचा अशी इच्छा त्यांना होऊ लागली. निकटच्या स्त्री सहवासात देखील आपल्या मनात विकार उद्‌भवत नाहीत अशी परीक्षा पाहून आपले ब्रह्मचर्य कसोटीला उतरले याची धन्यता मानावयाची अशी त्यांची वृत्ती बनली. आपल्या मनात तर विकार उद्‌भवत नाहीच, पण जवळ आलेल्या स्त्रीच्या मनातही आपल्याविषयी पवित्र भावनाच निर्माण होते, अशी ते खात्री करून घेत. गांधींची नात (पुतण्याची मुलगी) मनू गांधी हिचे असे सांगणे असे की, तिच्या मनात कामभावनेचा उद्‌भवच झालेला नव्हता. गांधींना आपली विकारहीनता व मातृत्वभावना ह्यांची चाचणी घेण्याला ही मुलगी योग्य वाटली व आई ज्याप्रमाणे आपल्या मुलीला आपल्या सहवासातून शिक्षण देते त्याप्रमाणे तिला शिकवण देण्याला व तिचा प्रतिपाळ करण्याला गांधींनी सुरूवात केली.

हे सर्व इथे लिहिण्याचा हेतू असा की, गांधींना ब्रह्मचर्याची ओढ होती, स्त्रीकडे विकारहीन दृष्टीने पाहता आले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता आणि त्याच्या पुढची पायरी म्हणजे स्त्रीसुलभ मातृत्व भावनेने आपण परिवारातील व्यक्तींचे पालन करावे अशी त्यांची आकांक्षा होती. ब्रह्मचर्याचे हे उच्च शिखर गाठण्यात आपण कमी पडलो. त्यामुळे आपण चालविलेला अहिंसेचा प्रचार फलदायी होत नाही, अशी खंत त्यांना वाटू लागली. आपले ब्रह्मचर्याचे प्रयोग अधिक कसोशीने करण्यास त्यांनी नोआखलीत सुरूवात केली. असे प्रयोग करण्या-

मागील त्यांची दृष्टी शुद्ध व पवित्र असली तरी ती त्या प्रयोगांमुळे त्यांच्या परिवारात मात्र अनेक ताणतणाव निर्माण होत.

गांधी, हवा चांगली असेल तर, उघड्यावर झोपत व पाऊस-वारा असेल तेव्हा खोलीत झोपत. गांधींपाशी खाजगीपणा (प्रायव्हसी) असा काही नव्हताच. त्यांच्या बिछान्याच्या आसपास इतर स्त्री-पुरुषांच्या पथाऱ्या पसरलेल्या असत. काही व्यक्ती गांधींच्या बिछान्यातही झोपत. गांधींना कधी हुडहुडी भरुन येई, हात-पाय गार पडत. अशा वेळी त्यांना घट्ट मिठी मारून त्यांना ऊब देण्याचे काम अन्तेवासियांना करावे लागे. अशा प्रसंगात मनात तर नाहीच पण या परिचारकांच्या मनातही विकार उद्‌भवत नाहीत ना, याची खात्री गांधी पुनः पुनः प्रश्न विचारून करून घेत. आपण स्वतः हीन भावनांपासून मुक्त असू तर परिचारकही, शरीरे जवळ आली असूनही, विकारांपासून अलिप्त राहील, असे गांधींना खात्रीने वाटे.

पुरुष सुलभ काम भावनेच्या पूर्ण निपटारा करून स्त्रीत्वाची प्राप्ती करून घेण्याची आकांक्षा काही संतांनी धरल्याचे दाखले आहेत. श्री. रामकृष्ण परमहंसांना तर रजोद्रावही होत असे व शरीराच्या छिद्रातून रक्ताचे थेंब पाझरत, असे सांगतात.[१६] आपल्याकडील श्री गुलाबराव महाराज स्वतःला संत ज्ञानेश्वरांची मुलगी म्हणवून घेत व स्त्रीलाच शोभेल अशी लज्जा भगवान कृष्णाचे नाव घेताना त्यांच्या चेहऱ्यावर खुलून येई, असे अनेकांनी लिहून ठेवले आहे. गांधींची प्रगती त्याच दिशेने चालली होती; पण रामकृष्ण अगर गुलाबराव यांना केवळ पुरुषी वैषयिकतेपासूनच नव्हे तर प्रापंचिकतेपासूनही सुटका लाभली होती, तशी सुटका गांधींना लाभली नव्हती; नव्हे, परिवारातील व्यक्तींच्या सुखदु:खांशी व क्षेम-कुशलाशी ते बांधील होते व त्यापासून तुटून दूर व्हावे असे त्यांना वाटतही नव्हते. रामकृष्ण परमहंस किंवा गुलाबराव महाराज हे जगन्मुक्त होते तर गांधी 'यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः।' या पायरीवर पोचलेले व परमेश्वराला प्रिय होतील असे योगी होते.

गांधी स्वतः शुद्ध व हर्षामर्षभयोद्वेग इ. भावनांपासून अलिप्त असणारी विभूती असले तरी त्यांच्या परिवारातील व्यक्ती काही त्या पदवीला पोचलेल्या नव्हत्या. साहजिकच आपण गांधींच्या जितके जवळ असू जितक्या प्रमाणात आपला गांधींवर जास्त अधिकार आहे आणि तितक्या प्रमाणात आपण इतरांपेक्षा श्रेष्ठ आहोत असा अहंकार त्या व्यक्तींच्या ठिकाणी निर्माण होई; गांधींच्या काही 'सलगी देण्यातून' अशा अहंकाराला खतपाणी मिळे, अशा प्रकारची उदाहरणे निर्मलकुमार बोसांनी दिली आहेत. गांधींचा चिटणीस परशुराम व नंतर खुद्द बोसही गांधींना सोडून निघून गेले. त्याच्यामागील कारणांपैकी एक कारण गांधींच्या परिवारात चालणाऱ्या कुरघोडी व धुसफुशी हेही होते. असो.

मागे सांगितल्याप्रमाणे गांधी २ मार्च १९४७ रोजी नोआखलीतून बाहेर पडले ते पुनः काही नोआखलीत आले नाहीत. गांधींचा चंपारण्यातील लढा किंवा बार्डोलीतील लढा जसा यशस्वी झाला होता तसा नोआखलीतील त्यांचा लढा यशस्वी झाला नाही, हे मे १९४७ मध्येही नोआखलीत हिंदूंना ज्या छळाला व होरपळीला तोंड द्यावे लागत होते, त्यावरून दिसून येते. या अपयशाचे कारण, आपल्या सत्याग्रहाच्या तत्त्वानुसार, आपल्या सत्त्वातील अशुद्धाच्या उपस्थितीत असल्याचे गांधी मानत असतीलही, पण राजकीय दृष्टिकोणातून पाहिले तर असे वाटते की, चंपारण्यात किंवा बार्डोलीत गांधी सुसंघटित साम्राज्यवादी शक्तींशी सामना करीत होते. या शक्तींची निश्चित धोरणे व प्राप्तव्ये होती आणि या धोरणांपैकी व स्वार्थांपैकी कोणते महत्त्वाचे व कोणते बाजूला ठेवण्याजोगे हे ठरविण्याचे तारतम्य संघटिपणामुळे या साम्राज्यवादी शक्तींकडे होते. नोआखलीत आंधळे धर्मवेड व पिसाट अत्याचार यांचा धुंद हैदोस चालला होता. त्याला आत्मबळ, अहिंसा आणि नैतिकता यांच्या सहाय्याने आळा घालण्यास चार महिन्यांचा काळ पुरेसा नव्हता. त्यासाठी दीर्घकाळ व अधिक नेटाने प्रयत्न करण्याची गरज होती. दुर्दैवाने गांधींना तेवढी सवड लाभली नाही.

**संदर्भग्रंथ व तळटीपा :**

१. Communalism in Bengal.
Rakesh Bataloyal.






Sage Publication, New Delhi 2005.
२. My Days with Gandhi.
Nirmal Kumar Bose.
Nishana, Calcutta 1953.

I) I heard Jawaharlal saying, 'There is now a Hindu political India just as they have made a Muslim political India.' He further said with emphasis that almost everyone, including Gandhiji and himself, had been forced almost into a communal position. ((२) पान, १२८) यावरून नेहरुंसारख्या धर्मभेदातीत मनुष्याचीही कशी कोंडी झाली होती, ते कळून येते.

२. (१) पान २७७-२७९
३. (१) पान २८३-८४
४. तेथेच
५. (२) पान १५०
६. (१) पान २८९
७. (२) मधील पान Appendix
८. (१) मधील पान ३१७, तळटीप
९. (१) मधील पान २३७-३८
१०. (१) पान ३४४ तळटीप
११. (२) पान १२५
१२. (२) पान १४०
१३. (२) पान १४९
१४. (२) पान १९३
१५. (२) पान २०१
१६. (२) पान २०६

---

## लेखकांचा परिचय

❋ **आचार्य शं. द. जावडेकर**
सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष. 'नवभारत' मासिकाचे माजी संपादक.

❋ **श्री. बाबूराव चंदावार**
समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक
***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

❋ **प्रा. डॉ. व्ही. व्ही. बडवे**
शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे इंग्रजीचे प्राध्यापक होते. त्यांनी अनेक इंग्रजी लघुकथांची मराठी भाषांतरे केली असून तुर्जेनेव्हच्या 'फादर्स अॅण्ड सन्स' या कादंबरीचेही मराठी भाषांतर केले आहे.
***पत्ता :*** बी – १४, दीप्ती पॅलेस, न्यू पॅलेस रोड, कोल्हापूर – ४१६ ००३.

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

- संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*



अनुक्रमणिका

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

- संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*








आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत
२० नोव्हेंबर २००६
पासून लागू

- **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ३०० रु
- **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती — २०० रु
- **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन — १२० रु
- **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल — २५
- **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** — ६०
- **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी — ६०
- **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी — १५० रु
- **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट — ६० रु
- **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. बा. लेले — ५० रु
- **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे — ४० रु
- **इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती)** । सदाशिव आठवले — १३० रु
- **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील — १५० रु
- **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण — ४० रु
- **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी — १४० रु
- **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे — २५ रु
- **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य — ५० रु
- **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे — १६० रु
- **पाच पुस्तक-परीक्षणे** । बा. म. कुलकर्णी — ६० रु
- **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर — ३० रु
- **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर — १०० रु
- **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि. के. बेडेकर — ३० रु
- **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** — १०० रु
- **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** — १५० रु
- **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे — १२० रु
- **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** — २०० रु
- **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले — १०० रु
- **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर — १२० रु
- **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द. ना. धनागरे — ४० रु
- **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे — ५५० रु
- **हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — २२५ रु
- **पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास** (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे — १६० रु

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोज भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका